सूत्राणि.

**एकस्मिन् वा देवतांतराद्विभागवत् ॥ ४० ॥ (सि०) ॥**

**भावार्थः ।** यत् पूर्वपक्षकारेणोक्तं तन्न । एकस्मिन् प्रतिपदोक्ते चोदितेऽवयवान्तरं विभक्तं न संगृह्यत इति सूत्रार्थः । तस्माद् देवतांतरविषयेऽमन्त्रकं भक्षणम् ॥

## गायत्रच्छंदसः-इत्यादिमन्त्राणामनेकछंदस्के विनियोगाधिकरणम् ॥

**छंदश्च देवतावत् ॥ ४१ ॥ (पू०) ॥**

**भावार्थः ।** देवताऽनुरोधेन छंदसो ग्रहणम् । ऐंद्राग्नविषये इन्द्रानुरोधेनैकस्य छंदसो ग्रहणम् । अग्न्यनुरोधेनान्यस्य छंदसो ग्रहणम् । इंद्रपीतमन्त्रेण यत् पानं तस्यैकछंदस्कत्वम् । तस्मादनेकछंदस्के सोमपाने मन्त्रो नास्ति । अमन्त्रकं तत् ॥

मग ऐन्द्राग्न पेल्यातून सोम पितांना इद्रापुरता जो मन्त्र आहे तो म्हणावा. कारण ऐन्द्राग्न यामध्यें इद्र एक अवयव आहे आणि असे अवयव पडणें हें सूचक म्हणजे लिंग आहे यावरून ऐन्द्राग्न पेल्यातून सोमरस पितांना मन्त्र म्हणावा असे सिद्ध होतें

and signifies that of which Indra and Agni are the gods. Hence when soma is taken in the Aindrâgna-cup, the mantra Indrapîtasya is appropriate because it applies to Indra—a member of the dual god to whom Aindrâgna-cup is to be offered That the mantra—Indrapîtasya—applies to the Aindrâgna-cup because it applies to a god out of the dual god Indrâgni is an inferential statement or Lingabhâva as used in the sûtra Hence in drinking soma from the cup called Aindrâgna, the mantra—Indrapîtasya—is to be recited

४० एकाच पेल्याच्या सबधानें दुसरी देवता (आंत सापडली) तर (तें जोडपें) भिन्न समजावें

40 In the case of one (cup), (the oblation will be) divided because of another god (being seen in the one individual dual god) (Final statement)

## एक वेळ सोम पितांना ह्मणावयाचे गायत्रीछंद इत्यादि जे मन्त्रामध्यें निरनिराळे छंद येतात त्यांच्या विनियोगाविषयीं विचार

## THE SUBJECT OF THE USE OF THE DIFFERENT CHHANDASES (SUCH AS GAYATRA) MENTIONED TOGETHER IN ONE AND THE SAME MANTRA

४१ जसा देवतेविषयीं निर्णय तसाच छंदाविषयीं (निर्णय) असावा (पू०)

41 The chhandas (is fixed) as a god (to be invoked is fixed) (Opponent's statement.)

४० इंद्राग्नि या जोडप्याच्या नांवानें सोमरस घेऊन तो प्यावयाचा. तो पितेवेळीं इंद्राग्नि ह्मणजे एक देवता मग दोघी मिळून एक देवता मानून वेदांत तिच्याविषयीं मन्त्र सांगितला नाहीं ह्मणून ऐन्द्राग्न नांवाच्या पेल्यांतून सोम घेऊन पितांना मन्त्र ह्मणूं नये. हें कर्म अमंत्रक. वाक्यार्थ करण्याची अशी रीति आहे कीं, साधित शब्दाचा जो अर्थ होतो तो घ्यावयाचा. त्याचे अवयव पाडून जो अर्थ होतो तो घ्यावयाचा नाहीं. एका अवयवाचा मन्त्र आहे तो दुसऱ्या अवयवाचा समजावा ह्मणजे इंद्राचा मन्त्र आहे तो ऐन्द्राग्नाचा समजावा, असें ह्मटलें असतां ओढून ताणून अर्थ केल्यासारखें होतें. वाक्यार्थ करतांना लक्षणा क-

40. Soma is taken in the name of the individual dual god named Indrâgni. When it is drunk, the god—Indrâgni is invoked. But no mantra is prescribed in the Veda in the name of the dual god—Indrâgni. Hence no mantra is to be recited when soma is taken in the Aindrâgna-cup is to be drunk. Hence this act has no mantra. In exegetics, the sense of a derivative term is independently considered and its etymological sense is to be set aside: the derivative or a compound term has its sense: it can be altered or changed by its etymological analysis. An illustration will show the bearing of this exegetical principle. There is a mantra about Indra who is etymologically connected with the Aindrâgna-cup. Therefore, the mantra about him is also the mantra about Indrâgni. Such a conclusion is far

सूत्राणि.

**सर्वेषु वाऽभावादेकच्छंदसः ॥ ४२ ॥ ( सि० ) ॥**

**भावार्थः ।** सर्वेषु भक्षणेष्वेकं छदो न पठ्यते । भिन्नानि छदांसि पठ्यंते । तस्मादेकच्छंदसोऽभावाद् भिन्नच्छंदसां पठनाच्च सर्वत्र समन्त्रकं भक्षणं प्राप्नोतीति सिद्धम् ॥

## एकादशाधिकरणोपसंहारः ॥

**सर्वेषां वैकमन्त्र्यमैतिशायनस्य भक्तिपानत्वात् सवनोऽधिकारो हि ॥ ४३ ॥**

**भावार्थः ।** ऐतिशायनस्याचार्यस्य मते सर्वासा देवतानामेकमन्त्र्यं नामैकमन्त्रेण भिन्नदेवताविषये भक्षणं भवति । कुतः । भक्षणस्य सवनेन सह सम्बन्धः । यथा प्रातःसवने भक्षण सायसवने भक्षणंवा । न तु देवताभिःसह संबंधः । तस्माद् भिन्नपानविषयत्वात् सवनस्यैकाधिकारादैन्द्राग्नेऽपि पीतसवनेन्तर्भवति ॥ सूत्रं—सर्वेषां त्वैकमन्त्र्यं यतोऽयं सवनाधिकारः । तत्र हेतुः पानस्य भाक्तत्वादिति व्याख्येयमिति मीमांसाकौस्तुभः ॥

## तृतीयाध्यायस्य द्वितीयपादः समाप्तः ॥

लीशी होते. आणि लक्षणा जितकी न करवेल तितकी करू नये, असा वाक्यार्थमीमांसेचा सिद्धांत आहे. ( ३ १,२७ ) सूत्रीं जो विचार झाला आहे त्याचाच विशेष विचार सोमपानाच्या संबधानें एथें केला आहे.

४१ एक वेळीं सोम पितांना जो मन्त्र म्हणायाचा तो चोविसावे सूत्राखालीं दिला आहे त्यामध्यें गायत्र, अनुष्टुप् आणि जगती अशा निरनिराळ्या छदांचीं नावें आलीं आहेत.

fetched metonymy thus comes to bear in exegetics But it is a principle of exegetics to avoid metonymy so far as possible This subject is discussed in the (III 1,27 ) sûtra of this Mimânsâ It is introduced into this sûtra as connected with drinking soma

41 The mantra to be recited at the time of drinking soma is quoted under the twenty-fourth sûtra It mentions the names of such different chhandases as Gâyatra, Anustubh, and Jagatî But soma is to be drunk once

४२ तसें नव्हे सर्व वेळ सोम पितांना एक छंद येत नाहीं म्हणून सोम पितांना मन्त्र म्हणावा।

प्रकरणाच्या अधिकरणांत वर्णिलेल्या विषयाचा उपसंहार

४३ ऐतिशायनाचार्यांचें मत असें कीं, सर्व वेळ सोम पितांना एक मन्त्र, कारण सोमपान निरनिराळ्या वेळीं झाल्यामुळें सोम तयार करण्याचा विषय (घेऊन व्यवस्था करावी )

42 Not so Because of the absence of the one (and the same) metre in all cases (of drinking soma) (a mantra is to be recited)

THE SUMMARY OF THE SUBJECT DISCUSSED IN THE 26TH 27TH AND 28TH SŪTRAS

43 (In the opinion) of Aitishâyana in all cases (of drinking soma) one mantra only (is to be recited) because as the occasions (of drinking soma) are different, the general subject of squeezing and preparing soma regulates (the mantra)

---

सोम तर एकदां प्यावाचा, मन्त्र तर एकदां म्हणावाचा आणि छंदांचीं तर निरनिराळीं नांवें आलीं आहेत तेव्हां व्यवस्था कशी करावी ? जरी जाद्यात सांपडलेल्या दोहो देवतांपैकीं एका देवतेचा मन्त्र आला असला तरी हा मन्त्र म्हणावाचा नाहीं म्हणजे मन्त्र म्हटल्यावांचून सोम प्यावाचा, त्याप्रमाणेंच निरनिराळे छंद ज्याच मन्त्रांत येतात म्हणून मन्त्र म्हणूं नयेत. हेंच सोमपान अमंत्रक आहे असें बौद्धाचार्यांनीं म्हटलें पाहिजे

४२ वैदिकाचार्य म्हणतात—" अहो बौद्धाचार्य, या तुमच्या वादाच्या योगानें अतिव्याप्तीचें दूषण येतेंना ! जेव्हां

only the mantra is to be recited once only But different chhandases or metres are mentioned What is to be done? As no mantra is to be recited in the case of a dual god though one of the dual has a mantra, so a mantra is not to be recited in which different metres are mentioned at the same time The Buddhist therefore, states that drinking soma under any circumstances is without any mantra whatever

42. The Vaidikâchârya observes—Oh Bouddhâchârya, you argue too much. Whenever soma is to be drunk a mantra is to be recited, and such a mantra invariably mentions the names of two or three metres (chhandases) Hence you state that no mantra is to be recited at the time of drinking soma. How is this statement tenable? Hence it is

जेव्हा सोमपान करायाचें तेव्हा तेव्हा मंत्र म्हणावे लागतात आणि त्या सर्व मंत्रामध्ये दोन, तीन छंदाचें वर्णन असतेंच तेव्हा कधींहि सोम पिताना मंत्र म्हणूच नयेत असें तुमचें म्हणणें कसें चालेल? याकरितां जशी जोडप्याची देवता असली म्हणजे मंत्र म्हणू नयेत असें सिद्ध होतें तशी एका मंत्रात दोन तीन छंद असले म्हणजे तो मंत्र सोम पिताना म्हणू नये असें सिद्ध होत नाहीं" असा वाद होता होता बौद्धाचार्यांनी जी ही प्रतिबंधि दिली तिजकडे वाचकांनी लक्ष द्यावें.

४३ ज्यामध्यें इंद्रदेवता नाहीं असे सोमपानसमयीं मंत्र म्हणूंच नयेत असा सिद्धांत झाला म्हणजे अमंत्रक ते सोमपान करावें ही मीमांसकोंची व्यवस्था ऐतिशायनाचार्यास योग्य वाटली नाहीं ते असे म्हणतात कीं, जेव्हा जेव्हा सोम प्यायाचा तेव्हा तेव्हा चोविसाव्या सूत्राखालीं जो मंत्र दिला आहे तो म्हणायाचा. आतां सोम तर निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या रीतीनें प्यायाचा आणि मंत्र तर एक, ही व्यवस्था कशी करायाची? असें म्हटलें तर सोमपानाचा आणि मंत्राचा संबंध नाहीं सोमसवनाचा म्हणजे सोम तयार करण्याचा आणि मंत्राचा संबंध आहे आणि चोविसाव्या सूत्राखालीं जो मंत्र घेतला आहे त्याचा सोमसवन हाच विषय आहे. म्हणून केव्हांहि सोम प्याला असतां मंत्र म्हणावा हें योग्य म्हणजे सोमपान हें समंत्रक कर्म आहे, असें ऐतिशायनाचार्यांचें मत पडलें.

*not proved that a mantra which* mentions the names of two or three metres (chhandases) is not to be recited, because that mantra in which a single god is mentioned is not to be recited in the case of an oblation to be offered to a dual god In the course of this discussion, the Bouddhâchârya mentions a contrary instance as based on the mention of two or three metres in the same mantra The contrary instance tells as an argument. The reader can easily notice the way in which the Vaidikâchârya disposes of it

43 The Mîmânsakas state that on all occasions when Indra is not to be invoked, no mantra is to be recited, that is, soma is to be drunk without any mantra being recited Aitishâyana does not approve of the adjustment made by the Mîmânsakas He says that on all occasions, the same mantra is to be recited—the mantra known as Indrapîtasya and quoted under the twenty-fourth sûtra But soma is drunk on different occasions in different ways, and yet the same mantra is to be recited How can such an adjustment be made? Aitishâyana states in reply that there is no connection between drinking soma and the mantra recited, but that the process of preparing soma is essentially connected with the mantras recited The mantra quoted under the twenty-fourth sûtra bears on the preparation of soma Hence no matter when soma is drunk, the same mantra is to be recited, that is, in the opinion of Aitishâyana, a mantra is to be recited when soma is to be drunk

## उपसंहार

या उपसंहारांत दोन प्रकारचा विषय परीक्षा आहे. एक मीमांसाशास्त्रदृष्ट्या आणि दुसरी इतिहासदृष्ट्या. शब्द आणि त्याचा अर्थ यांचा नित्य परस्पर संबंध आहे. ज्याला अर्थ नाहीं तो शब्द नव्हे. ज्याला संज्ञा नाहीं त्याला अर्थच नाहीं. पुनः द्रव्याचा आणि क्रियेचा मात्र परस्पर संबंध असतो. गुणाचा आणि क्रियेचा संबंध द्रव्यद्वारा होतो. पण एका शब्दाचे दोन तीन अर्थ असतात तेव्हां कसें? शब्द उच्चारितांच ज्या अर्थाची उपस्थिति होते तो मुख्य अर्थ. त्या शब्दाचे बाकीचे अर्थ गौण. मुख्य आणि गौण या दोन अर्थांची एकदम उपस्थिति झाली असतां मुख्य अर्थ घ्यावा गौण अर्थ घेऊं नये. असा मीमांसकांचा सिद्धांत आहे. यास बर्हिन्याय असें म्हणतात. पुनः ग्रंथांत जें स्पष्ट वचन असेल त्याचा बरोबर अर्थ घ्यावा. केळीच्या पानावर बसून जमिनीवर जेवला असा जर लेख आहे तर त्याचा अर्थ जसा आहे तसा घ्यावा. जमिनीवर बसून केळीच्या पानावर जेवला असा सरळ अर्थ करण्यास शब्द ओढूं नये असा मीमांसकांचा सिद्धांत आहे. त्यास ते [illegible]न्याय म्हणतात. पुनः एका पदाचे दोन उपयोग झाले तरी चिंता नाहीं. हें सिद्ध करण्याकरितां मल्लार्थ उदाहरण घेतलें आहे. मल्लार म्हणजे एक सुंदर दर्भ


SUMMARY

In this summary two questions are discussed—the one from an exegetical point of view and the other from a historical point of view. First words and their significations are inseparably connected with each other. That which bears no sense is not a word. That which is not expressed by a name has no sense. Names of matter alone are connected with actions with which qualities can be connected only through the medium of names of matter. What is to be done however when one and the same word has more than one sense? The sense—which is conveyed as soon as a word is pronounced—is principal and the other senses are merely subordinate. When the principal and subordinate senses of a word are perceived by the mind at the same time the former sense is to be recognized and the latter to be ignored. This is the proposition laid down by the Mîmânsakas. This approximates to the division made by European logicians and known as the *first intention* and *second intention* of words. The Mîmânsakas denominate this proposition—the Barhir nyâya. Again, a direct statement made in any document determines the interpretation of a passage. For instance that he sat on a plantain-leaf and ate off the ground, is a statement. It is to be interpreted as it is. By means of straining the wording of the statement, it is not to be interpreted into "he sat on the ground and ate off a plantain leaf." This is another exegetical principle recognized by the Mî

ते वेदीवर हतरितात आणि त्याजवर यज्ञपात्रे माडतात हा त्याचा एक उपयोग आणि दुसरे, सूक्तवाक म्हणून एक मत्र आहे तो म्हणून त्याच मूठभर दर्भाचीअग्नीमध्यें शेवटीं आहुति देतात हा तिचा दुसरा उपयोग काहीं काम करण्याकरिता घेतलेला पदार्थ उगीच वाया जाऊ नये, त्याच कामाच्या सबधानें त्याची काही तरी योजना व्हावी असा मीमासकाचा सिद्धात आहे त्या योजनेस ते प्रतिपत्ति म्हणतात, आणि तत्सबधी सिद्धातास प्रस्तरप्रहरणन्याय म्हणतात पुन , मीमासकाचा असा सिद्धात आहे कीं, ज्या कामाला जें लागतें तें त्या कामाच्या सबधानेंच सगळ असें क्रियेच्या धोरणावरून काहीं पदार्थ पूर्ण किंवा अपूर्ण हें ठरवायाचे. या सिद्धातास मीमासक सूक्तवाकन्याय म्हणतात समाख्या म्हणजे काय आणि वाक्यार्थमीमासेंत तिची योग्यता काय हा विचार पुढच्या पादाच्या चवदाव्या सूत्रीं झाला आहे या पादामध्यें सोमपान करतांना मत्र म्हणावे किंवा नाहीं याचा वाद मोठ्या निकरानें झाला आहे आणि तैत्तिरीय सहितेंतील ( ३ २,५,१ ) हा मत्र घेऊन या मत्राचें या वादात उदाहरण घेतलें आहे अशा मत्राची इतिहासदृष्ट्या योग्यता केवढी आहे हें आता दाखवायाचें यज्ञाचें स्वरूप काय हें आम्हीं पूर्वीं वर्णिलें आहे यज्ञ म्हणजे धर्मससार. प्राचीन काळीं गोपालस्थितींत असता ससारात जीं कृत्यें आर्यांस करावीं लागत, तींच कृत्यें

mânsakas who denominate it the Gârhaptya-nyâya Again, it does not matter much if a thing be put to two different uses To illustrate this, the use of a handful of the Darbha-grass is instanced The handful is called Prastara It is spread on the sacrificial ground (Vedi) and upon it the sacrificial vessels are arranged. The same handful is thrown into a sacred fire as an offering, the mantra known as Sûkta vâka being recited Thus the Prastara serves two purposes —one as the seat of the sacrificial vessels and the other, as a burnt offering The Mîmânsakas hold that nothing whatever used in a sacrifice is to be thrown away It ought to be used somehow or other in connection with the same sacrifice Such a use of a sacrificial object is called Pratipatti And the principle which necessitates the final disposal of the object in connection with a sacrifice is denominated the Prastara-Praharana-nyâya Again, the Mîmânsakas lay it down as a principle that the whole object is taken when it is used in performing an action Thus whether an object is taken as a whole or in parts is determined by its connection with an action. This principle establishes the relationship between an object and an action The Mîmânsakas denominate it the Sûkta-vâka-nyâya The nature of Samâkhya or the apocryphal adjustment made by the Vaidikâchârya is pointed out and its importance, discussed in the fourteenth sutra of the next chapter, but it is introduced into the controversy between the Buddhist and the Vaidikâchârya as to whether mantras are to be

दर्श किंवा पौर्णिमेष्टि करतांना जे करत नित्य यजमानीण पाट वरवंट्यानें आणि त्याचा पुरोडाश करी ती वरवंटा वाट तांना गाणीं म्हणे "जाळला राक्षस, जाळले शत्रु" हें त्यांतलें एका गाण्याचें भाषांतर आहे पुन आपलो लोकांस सोमरस पिण्याचा नाद फार असे आणि सोम तयार करणें, तो गाळणें, तो छानणें, तो पेल्यांत घालून मांडणें या सर्वांचें वर्णन तैत्तिरीय संहितेंत केलें आहे त्यामध्यें सोमरस पात्रांत पाहिला म्हणजे आर्यजनांच्या मनास मोठी स्फूर्ति होत असे आणि तो पितांना ते गाणीं गात असत हीं गाणींहि वेदामध्यें सांपडतात अशीं सोमरस पितांना गाणीं कां गात याचा हि थोडा विचार केला पाहिजे माणूस म्हटलें म्हणजे गाणें हा त्याचा स्वभाव काम करतांना त्याच्या तोंडांत कांहींना कांहीं गाणें असतेंच उखळ कांडतांना बायकाहि त्यांच्या तोंडांत गाण्यांची एकेरी असतेंच प्राचीन काळीं वरवंटा वाटतांना आर्यस्त्रिया कसा प्रकारचीं गाणीं म्हणत हें आम्ही सुचविलें आहेच आतां सोमरस पितांना कोणतीं गाणीं म्हणत हें चौतिसाव्या सूक्ताच्या टिपेंत जो भग दिला आहे तो पाहिल्यानें समजेल सोमपानावर इतकें आर्यांचा भर कां? प्राचीन काळीं हिमालय पर्वत या एका भागास मूजवत पर्वताच्या पलीकडे जेव्हां आर्य राहत होते तेव्हां त्यांना सोम विपुल मिळत असे परंतु त्यांच्या अभिजन भूमीमध्यें कांहीं सळसळ हो

recited at the time of drinking soma. The application of the mantra given in the Taittirîya Sanhitâ (III 2, 5 1) is discussed in this connection

We will now s how the historical importance of this mantra and the discussion which originates in the problem of interpreting it. We have already described the form and nature of a sacrifice in general. A simple sacrifice, such as the new or full moon-sacrifice consisted in living a religious life a life devoted to gods. Whatever the Âryas, when in the pastoral condition practised they reproduced faithfully in the new and full moon-sacrifices. Then the wife of the sacrificer pulverized on a slab and muller rice into flour and made it into a cake She sang such songs as the following when she used a slab and muller —"A devil is burnt. the enemies are consumed." This is the translation of one of the songs. Again the ancient Âryas were particularly fond of drinking the soma juice The processes of bringing in soma, of sprinkling water upon it, of beating it till it acquired a consistency of squeezing it and putting it in goblets arranged in a particul r order—are described in the Taittirîya-Sanhitâ. The minds of the Âryas were warmed and excited at the sight of soma when seen in goblets They sang songs while they drank it. These songs are given in the Veda. The question why they sang songs at the time of drinking soma deserves to be considered Music of some sort or other is a part of hum n nature. Man sings at all times. We have indicated what the ancient Âryan women sang when they us-

ऊन ती अभिजन भूमि सोडून ते हिंदुस्थानात शिरले पंजाबामध्यें राहत असता सोमवल्ली मागे राहिली ती सहज मिळेनाशी झाली गधारी लोकाकडून ती विकत घ्यावी लागली सोमवल्ली मिळण्याविषयीं अडचण पडू लागली म्हणून तिचीं गाणीं फार झालीं ही सर्व गाणीं ऋग्वेदसंहितेच्या नवव्या मंडळात आहेत हीं गाणी आर्यकवींनी स्वतंत्रतेने रचलीं, परतु सोमरस पिताना वाक्य म्हणायाचें तें आबड धोबड, प्राचीन वाक्य आर्यकवीस किंवा ऋषीस फिरविता आलें नाहीं असा तैत्तिरीय संहितेचा आणि ऋक्संहितेचा संबंध दाखविता येतो अस्तु हा विचार स्वतंत्र करण्या जोगा आहे तांदूळ वाटण्याचेवेळचीं गाणीं आणि सोमपान करण्याचे वेळची गाणीं कशीं होतीं हें या पादामध्यें वर्णिलें आहे. आता सोमरसाची एवढी योग्यता का हें कळण्याकरिता एक दृष्टांत दिला पाहिजे इंग्रज लोक हिंदुस्थानात आले आणि त्याचें बर्फ विलायतेंत राहिलें मग हिंदुस्थानातील इंग्रजी वर्तमानपत्रामध्यें बर्फाच्या दुष्काळाचा विचार होतो आणि बर्फाविषयीं ते गाणीं रचतात. अशीच दशा प्राचीन आर्य लोकाची झाली सोमवल्ली गधारी लोकापासून विकत घेतली म्हणजे प्राणापेक्षा पलीकडे तिला जपायाचें. आणि पाणी घालून पिळून पिळून तिचा रस काढायाचा. एक तुकडा देखील तिचा वाया जाऊ द्यायाचा नाहीं आणि मग हा सोमरस पिताना मंत्र म्हणायाचा तो मंत्र ऋग्वेदसंहितेत वर्णिलेल्या कवींनीं

ed a slab and muller The nature and form of the songs sung at the time of drinking soma will be illustrated by the mantra quoted fully under the twenty-fourth sutra Why did the Âryas attach such importance to drinking soma? When the Âryas dwelt in a land in the neighbourhood of a mountain range called Mûjavat, they could obtain soma in any quantity But a revolution took place in their native land—a revolution which compelled them to leave their homes, and to turn towards India They left soma behind them, when they had settled in the Punjab they could not obtain it easily they had to purchase it from a people called the Gandhâri because they experienced great difficulties in obtaining soma, its importance was magnified, and a variety of songs about it were sung These songs are given in the ninth Ma*n*dala of the *R*ik-Sanhitâ The ancient Âryan poets composed them without any reference to a special sacrifice Though they were recited before the sacrificial assemblages of Âryan priests, warriors, and merchants, yet the passage recited at the time of drinking soma contrasts with these songs as it is uncouth, unmusical and irregular prose. This circumstance is important for neither the *R*isis nor the Âryan poets could lay their violent hands upon a passage which they had inherited from their ancestors, and which had been chaunted for generations at the time of drinking soma But this prose-passage is given in the Taittirîya-Sanhitâ A relationship between the Taittirîya and *R*ik-Sanhitâs can be thus established and a chronology proposed Suffice it to remark that the subject of the

केलेला नव्हे तो मंत्र फार प्राचीन आणि असाचे तसाच न बदलतांना राहिलेला त्या मंत्रा या अर्थाचा विचारहि या पादात झाला आहे असा तैत्तिरीयसंहिता पूर्व मीमांसा आणि आर्यांचा प्राचीन इतिहास यांचा परस्पर संबंध आहे इतिहास दृष्ट्या या संवादाची योग्यता काय हें नीट लक्षांत ये या करितां या पादाच्या संबंधानें जितकें वर्णन करणें आवश्यक तितकेंच आम्हीं केलें आहे शिवाय जे विचार सुचविले आहेत त्यांचा विचार स्वतंत्रपणें सविस्तर करू

relative antiquity of the two Sanhitâs deserves to be considered independently. The interpretation of passages chaunted at the time of pulverizing rice into flour and of drinking Soma is discussed at length in this chapter. We will illustrate the importance of the Soma drink by referring to a fact. The English on their arrival in India leave their ice behind them in England. Hence there are long articles and much correspondence in newspapers on what is called ice-famine, and even songs are composed about ice. Similar to this was the condition and feelings of the ancient Âryas who took greater care of Soma after it was purchased from the Gandhâri than life itself and strained it after often sprinkling water upon it till no juice could be extracted from it; not a single bit of the Soma-creeper was wasted. While drinking Soma, a sacred mantra was chaunted. The mantra is not the composition of any Risi or poet of the Rik Sanhitâ : it is older than the songs of the Rik Sanhitâ; it remained unaltered and was chaunted as it was bequeathed. Such an important mantra is often quoted in this chapter in illustration of the contro uray as to whether mantras are to be recited or not when soma is drunk. Thus there is a close relationship between the Pûrva Mîmânsâ, the Taittirîya Sanhitâ and the ancient history of the Indian Âryas. We have only indicated the historical bearing of the contro uray described in this chapter and have dwelt upon it so far as neu ry to show its importance. With regard to the particular question of the relative antiquity of the Rik and Taittirîya Sanhitâs it will be independently discussed elsewhere.

# अथ तृतीयाऽध्यायस्य तृतीयः पादः ॥

## अथोच्चैस्त्वादीनां वेदधर्मताऽधिकरणम् ॥

### श्रुतेर्जाताधिकारः स्यात् ॥ १ ॥ ( पू० ) ॥

**पदार्थः** । श्रुतेः=श्रवणात् । जाताधिकारः=जात्यधिकारः ॥

**वाक्यार्थः** । वेदे प्रतिपदोक्तश्रवणादेव ऋगादीनां ऋग्जात्या ग्रहणम् ॥

**भावार्थः** । कुत्र चिद् वेदे पदर्चां वा साम्ना वा यजुषां वर्णनमस्ति तदुद्दिश्य पूर्वपक्षकारः पृच्छति ऋगादीनामृक्त्वेन ग्रहणं वा वेदत्वेनेति । ब्रवीति च ऋक्त्वेन न तु वेदत्वेनेति । ऋक्त्वेन ग्रहणाद् ऋग्जातिकानामृग्वेदव्यतिक्रातानामृचां ग्रहणं भवति । वेदत्वेनेत्युक्त चेत् सर्वासामृचां ग्रहणमापतेत् ॥ ज्योतिष्टोमे श्रूयते । उच्चैर्ऋचा क्रियते उपांशु यजुषा उच्चैः साम्नेति । तत्र विधिवाक्ये मन्त्रवाचिनामृगादिशब्दानां प्रयोगान् मंत्रधर्मा उच्चैस्त्वादयः । तथा सति यजुर्वेदोत्पन्ना अध्वर्युणा प्रयुज्यमाना अप्यृच उच्चैरेव पठितव्या इति चेदिति पूर्वपक्षाशयं माधवो वर्णयति ॥

अनुसधेयानि वेदवाक्यानि ॥

उच्चैर्ऋचा क्रियते उच्चैः साम्ना उपांशु यजुषा ॥

### वेदो वा प्रायदर्शनात् ॥ २ ॥ ( सि० ) ॥

**भावार्थः** । वेदस्य बाहुल्येन दर्शनादृचां वेदत्वेन ग्रहणम् । न तु जात्या ॥

अनुसन्धेयानि वेदवाक्यानि ॥

प्रजापतिर्वा इदमेक आसीत् स तपोऽतप्यत तस्मात्तपस्तेपानात् त्रयो देवा असृज्यंत अग्निर्वायुरादित्यः । ते तपोऽतप्यत तेभ्यस्तेपानेभ्यः त्रयो वेदा असृज्यन्त अग्नेर्ऋग्वेदो वायोर्यजुर्वेद आदित्यात् सामवेदः ॥

# तिसऱ्या अध्याया-चा तिसरा पाद

## आता उच्च किंवा नीच स्वरानें म्हणणें हा वेदांचा धर्म आहे हा विचार

१ प्रतिपदोक्त वर्णनावरून जातीचें निरूपण आहे (पू०)

२. तसें नव्हे पुष्कळ वेळ वर्णन आल्यावरून (वेद) घ्यावा (सि०)

१ वरील सूत्रामध्यें 'जातावें निरूपण" हीं पदें विचार करण्याजोगीं आहेत मूळ संस्कृत सूत्रामध्यें "जाताधिकार" असें पद आहे जातपदाचा अर्थ आ हीं जाति असा केला आहे अधिकार म्हणजे सगर, विभाग असा अर्थ होतो विशेष निरूपण करणें हें पुढील वेदवाक्याच्या आधारावर समजेल ऋग्वेदाचे मन्त्र उच्च स्वरानें म्हणावे सामें उच्च स्वरानें म्हणावीं, यजुर्वेदमन्त्र नीच स्वरानें म्हणावे ' या वेदवाक्यामध्यें ऋचा साम असें विशेष वर्णन केलें आहे यावरून पूर्वपक्षकार असें म्हणतो कीं यजुर्वेदांतील मन्त्र हळू म्हणावे म्हणजे कोणते मन्त्र हळू म्हणावे? यजुर्वेदामध्यें ऋ

# THE THIRD CHAPTER OF THE THIRD BOOK.

## THE SUBJECT OF LOUD OR LOW RECITATION BEING A PROPERTY OF THE VEDA.

1 (There is) a systematic general statement of the kinds (of the Vedas) because of their being directly mentioned (Opponent's statement)

2 Not so (It is) generally seen (that) the Veda (is a genus by itself) (Final statement.)

1 The term Jâtâdhikâra as used in the sûtra deserves examination. Jâtam of the neuter gender signifies a class. But it is seldom met with as a first part of a compound. The term adhikâra signifies a systematic general statement. It is stated in the sûtra that different kinds of the Vedas are directly spoken of. This statement is based on the following Vaidika text— "The Rik verses are recited aloud the Sâma hymns are sung aloud the Yajus-verses are recited low This text speaks of the kinds of the Vedas such as Rik, Sâma and Yajus. The opponent asks—"when it is said that the Yajur mantras are to be recited low what mantras are to be referred to? Are the Rik verses that occur in the Yajur

सूत्राणि.

**लिङ्गाच्च ॥ ३ ॥ ( यु० १ ) ॥**

**भावार्थः ।** पुनः ऋक्शब्देनर्ग्वेदो ग्रहीतुं शक्यते । कुत । प्रतिपदोक्तवेदवाक्यदर्शनात् ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

ऋग्भिः पूर्वाह्णे दिवि देव ईयते । यजुर्वेदे तिष्ठति मध्ये अह्नः । सामवेदेनास्तमये महीयते । वेदैरशून्यस्त्रिभिरेति सूर्यः । तै० ब्रा० (३.१२, ९,१.) ॥

**धर्मोपदेशाच्च न हि द्रव्येण सम्बन्धः ॥ ४ ॥ (यु० २ ) ॥**

**भावार्थः ।** अस्य सूत्रस्य द्वे दले स्तः । प्रथमदलेनोच्चैस्त्वादिधर्मोपदेशः क्रियते । यस्माद् वेदत्वेनर्चां ग्रहण । न तु जात्या नाम ऋक्त्वेन । द्वितीयदलेन पूर्वोक्तस्य हेतुर्निरूप्यते । कथ ऋग्वेदात् सामवेदो भिन्नः यद्यप्यृग्भ्यः सामानि न भिन्नानि । प्रगीतेन विकृतर्चा साम नामधेयम् । तस्माद् न सामद्रव्येण नाम सामव्यक्त्या सहोच्चैस्त्वादिधर्मस्य सम्बन्धः । किं तु सामवेदेन सह ॥

**त्रयीविद्याख्या च तद्विदि ॥ ५ ॥ ( यु० ३ ) ॥**

**पदार्थः ।** तद्विदि=तान् वेत्तीति तद्विद् । तस्मिन् ॥

त्रयी यस्य विद्या सः=त्रयीविद्यः । यः त्रीन् वेदान् जानाति स त्रयीविद्य इत्युच्यते । त्रयीशब्द ऋक्सामयजुर्वेदेषु प्रसिद्धः । तस्मादृचा न त्वक्त्वेन ग्रहणं । किं तु वेदत्वेन ॥

---

चा येतात त्या हळू म्हणायाच्या किंवा मोठ्यानें म्हणायाच्या? वेदवाक्यामध्ये ऋचा, सामें, असें विशेष वर्णन आहे म्हणून यजुर्वेदामध्यें ज्या ऋचा येतात त्या मोठ्यानेंच म्हणायाच्या असें आमचें म्हणणे आहे

veda to be recited aloud or low? The text quoted mentions particularly the *Riks*, Sâmas and Yajus-mantras We, therefore, state that the *Riks* which occur in the Yajur-veda are to be recited aloud."

३ सूचक (वेदवाक्य) हि (आहे) (यु० १)

४ पुन, धर्माचें वर्णन आहे म्हणून (सामान्य वेद घ्यावा, विशेष मंत्र घेऊ नयेत,) कारण धर्मांचा द्रव्याशीं संबंध नाहीं (यु०२)

५ तीन जाणणारा हें तीन वेद जाणणाराचें नांव आहे (यु० ३)

3 And because of an inferential statement (Argument in support of the final statement)

4 Again, because of the authoritative dissertation of properties (the generic Veda is to be taken) because (properties have) no connection with (a name of) matter (2 Argument in support of the final statement)

5 Trayividya a knower of (the) three, (is) the name of him who knows the three Vedas (3 Argument in support of the final statement)

२ पूर्वपक्षकाराच्या ह्या भाषणावर यजुर्वेदामध्यें ऋचा आल्या असतां त्या उच्च स्वरानें म्हणाव्यात असें आहे तें योग्य नाहीं. यजुर्वेदांतील ऋचा नीच स्वरानेंच म्हणाव्या. कां? जेथें ऋचा, साम, आणि यजुर्मंत्र कोणत्या स्वरानें म्हणावे हें सांगितलें आहे तेथेंच वेदांत असें वर्णन आहे कीं 'अरे प्रजापति हें एक पूर्वी होतें, त्यानें तप केलें, मग त्या तप करणारापासून तीन देव उत्पन्न झाले त्यांचीं नांवें अग्नि, वायु, आणि आदित्य त्यांनीं तप केलें; त्या तप करणाऱ्यापासून तीन वेद उत्पन्न झाले अग्निपासून ऋग्वेद उत्पन्न झाला वायूपासून यजुर्वेद उत्पन्न झाला आदित्यापासून साम

2. The Vaidikâchârya remarks.—"Oh Bouddhâchârya, it is not proper as you say to recite aloud the Rik verses occurring in the Yajur veda. They are to be pronounced low. Why? Because there is the following text connected with that which you quote. Oh, Prajâpati this one was. He warmed (himself by mean of) tapa from him warming (himself by means of) tapa, three gods were produced—Agni, Vâyu and Âditya. They warmed (themselves by means of tapa) from them warming (themselves by means of) tapa, three Vedas were produced—from Agni the Rig veda (was produced), from Vâyu the Yajur-veda, and from Âditya, the Sâma-veda. Thus it will be seen from this Vaidika text that Rik, Sâma, and Yajus are each called Veda. Hence the

वेद उत्पन्न झाला." या वेदवाक्यावरून ऋक्, यजु आणि साम यांस वेद म्हटलें आहे जे यजुर्वेदांत ऋग्मंत्र येतात त्यावर दोन धर्म आहेत ते ऋचा आहेत आणि ते यजुर्वेदांतील मन्त्र आहेत तर ऋचा आणि यजुर्वेद यांचा परस्पर संबंध काय? यजुर्वेद हें एक जातिवाचक पद आहे आणि ऋचा हेंहि एक जातिवाचक पद आहे. परंतु यजुर्वेद ही परजाति आहे आणि मीमांसकांचा सिद्धांत असा आहे कीं अपरजातीस टाकून परजाति घ्यावी म्हणजे यजुर्वेदांत ज्या ऋचा येतात त्या ऋचा असतांहि ऋग्वेदांत आल्या नाहींत म्हणून त्या यजुर्वेदमन्त्राप्रमाणें हळू म्हणाव्या असें कां करावें? तर ऋचा, सामें आणि यजुर्मंत्र यांची वेद ही संज्ञा आहे असें वारंवार आढळतें इतकें सूत्राचें रहस्य आहे

३ संस्कृत सूत्राखालीं जें वेदवाक्य घेतलें आहे त्याचा अर्थ करून दाखवितों "ऋचासहवर्तमान प्रातःकाळीं आकाशामध्यें देव येतो दिवसाचे मध्ये (दुपारीं) यजुर्वेदाच्या योगानें उभा राहतो सामवेदाच्या योगानें सायंकाळीं योग्यता पावतो शून्यरहित तीन वेदांचे योगें करून सूर्य येतो" या वाक्यांत प्रथम चरणीं ऋचांच्या योगानें देव येतो असें वर्णिलें आहे आणि चतुर्थ चरणीं तीन वेदांच्या योगानें देव येतो असें वर्णिलें आहे तेव्हां ऋचा या पदाचे दोन अर्थ होतात एक ऋचा म्हणजे ऋक्संहितेंतील विशेष मन्त्र,

*Ṛik*-verses which occur in the Yajur-veda partake of two properties—that they are *Ṛiks* and that they occur in the Yajur-veda What is the relationship between such *Ṛiks* and the Yajur-veda? The terms *Ṛiks* as well as the Yajur-veda are names of classes but the latter is a genus, while the former is only a species It is the principle of the Mîmânsakas as stated in (1 4,7-22) that a generic statement is not to be set aside by a specific one This shows that the *Ṛiks* occurring in the Yajur-veda are not to be considered to be *Ṛiks*, but Yajur-mantras and are to be recited low How is this? It is generally seen that Veda is the name of the *Ṛik*, Sâma and Yajur-mantras " This is the gist of the sûtra

3 The Vaidika text quoted under the Sanskrita sûtra, if translated, will elucidate the sûtra "The god comes into the firmament in the morning by means of the *Ṛiks*, (he) stands at noon by means of the Yajur-veda by means of the Sâma-veda (he) is glorified at sunset by means of the three complete (without any deficiency—ashûnya) vedas, the sun progresses (eti) " The first part of this text describes that the god comes by means of the *Ṛiks*, and the fourth part speaks of the god progressing by means of the three vedas Hence the term *Ṛik*-verses has two senses—the one is that *Ṛiks* are the individual *Ṛik*-verses of the *Ṛig*-veda, and the other—the *Ṛiks* are the whole *Ṛig*-veda itself Hence the sense of the text quoted under the first sûtra is—the *Ṛik*-verses of the *Ṛig*-veda are to be recited aloud, that is, not the *Ṛik*-verses which

आणि दुसरा—ऋचा म्हणजे सारा ऋग्वेद धरून "ऋचा उच्च स्वरानें म्हणाव्या" याचा अर्थ ऋग्वेदांतील ऋचा उच्च स्वरानें म्हणाव्या। यजुर्वेदांतील म्हणू नयेत

४ "उच्च स्वरानें ऋग्मन्त्र म्हणावेत उच्च स्वरानें साममन्त्र म्हणावेत आणि नीच स्वरानें यजुर्मंत्र म्हणावेत" असें वेदवाक्य आहे याच्या अर्थाविषयीं विचार चालला आहे तर उच्च स्वरानें हा एक धर्म आहे आणि ऋचा सामें हीं द्रव्यें आहेत हें सांगणें आवश्यक आहे कीं ज्या द्रव्यवाचक उच्चार सूत्रांत केला आहे, त्याचा अर्थ ऋङ्मन्त्र आणि साममन्त्र असा केला आहे त्या द्रव्यवाचक अर्थ विचार करण्याजोगा आहे कारण चक्षुरिंद्रियविषय जर द्रव्य आहे तर श्रोत्रेंद्रियविषयहि द्रव्य आहे धर्माचा क्रियेशीं संबंध असतो आणि हा संबंध द्रव्य द्वारा घडतो असाच प्रकार एथें "उच्च स्वरानें म्हणावे" या वाक्यामध्यें उच्च स्वरानें याचा संबंध म्हणावें याकडे आहे उच्च स्वरानें ऋचा म्हणाव्यात असें म्हटलें असतां ऋग्वेद व्यापाचा म्हणून वेद ही परजाति असें समजावें आणि ऋङ्मंत्र, साममंत्र आणि यजुर्मंत्र ही परजाति असें समजूं नये

५ तीन म्हणजे ऋक् साम, आणि यजु आणि हे तीन वेदच असें एकेरी चाल याची परिपाठी आहे म्हणून ऋङ्मंत्र म्हटले म्हणजे विशेष मंत्र व्यापाचे नाहींत तर ऋग्वेद व्यापाचा. यथीविद्य त्रिविद्य त्रयीविद्य असें तीन वेद जाणणारास म्हणतात

occur in the Yajur-veda. This is proved by the text quoted and translated at the out-set—a text which makes an inferential statement. This is the gist of the sûtra

4 The text we have already quoted is— the *Rik* verses are to be recited aloud the Sâma-verses aloud and the Yajus verses low" The interpretation of this text is under discussion Aloud is a property while the *Rik* verses and Sâma verses are names of matter It is necessary to remark that the term *dravya* as used in the sûtra and as denoting *Rik* verses and Sâma verses deserves to be noticed for if what is seen is matter then what is heard is also matter A property is connected with an action through the medium of names of matter but this is not the principle involved in this case. In the text the *Riks* are to be recited aloud the quality *aloud* is directly connected with the action of reciting and the name *Riks* stands for the *Rig* veda. Hence to the *Rig* veda as a whole and not to the individual *Rik* verses, the doctrine of loud recitation applies.

5 The three are the *Rik* the Sâma, and the Yajur vedas, and not the three *Rik*, Sâma, and Yajus verses for Trayîvidya is the name of one who knows the three Vedas. Hence when *Riks* are spoken of individual verses are not to be understood but the *Rig* veda.

सूत्राणि.

**व्यतिक्रमे यथाश्रुतीति चेत् ॥ ६ ॥ (आ०) ॥**

**भावार्थः ।** यजुर्वेदांतःपतितानामृचामुच्चैस्त्वमित्युक्तं चेद् व्यतिक्रमो भवति । को नाम व्यतिक्रमः । व्यतिक्रमस्तु विपर्ययः । ऋग्वेदे या ऋचस्ताः शुद्धाः । यजुर्वेदांत.पतिना यास्ता व्यतिक्राताः । पूर्वाभ्यः शुद्धाभ्यो भिन्नाश्च । अङ्गीकृते व्यतिक्रमे यथाश्रुति व्यवस्था कर्तुं शक्यते ॥ (आभाषांत सूत्रम् ) ॥

**न सर्वस्मिन् निवेशात् ॥ ७ ॥ ( आ० नि० ) ॥**

**पदानि ।** न सर्वस्मिन् ( वेदे ) निवेशात् ॥

**वाक्यार्थः ।** सर्वस्मिन् वेद उच्चैस्त्वादिधर्माणां निवेशे कृते न दोषः ॥

**भावार्थः ।** उपांशुत्वं यजुर्वेदसंबंधेनर्चां धर्मः । पुनरुच्चैस्त्वमृग्वेदसंबधेनर्चां धर्मः । अत ऋचा धर्मद्वयेऽङ्गीकृते न दोषः । न विकल्पापत्तिर्न बाधापत्तिर्वा ॥

**वेदसंयोगान्न प्रकरणेन बाध्येत ॥ ८ ॥ ( आ० नि० ) ॥**

**भावार्थः ।** वेदसंयोगाद् वाक्येन प्रकरणे बाध्यमाने न दोषो भविष्यतीति शबरः ॥ प्रथमसूत्रेऽनुसंहितं यत् तद्वाक्य । ज्योतिष्टोमे यद्विषयेण सह तद्वाक्यस्य संबंधः तत्प्रकरणम् । प्रकरणाद् वाक्यं बलीय इति वाक्यार्थमीमांसकानां सिद्धांतः । तस्माद् वेदसंबधेन प्रकरणबाधाद् न दोष इति सूत्रार्थ. ॥

आणि ऋचा असे दोन्ही धर्म घेऊन अर्थ केला असता अर्थ वसत नाही. ऋचा ह्या ऋग्वेदातील हि मंत्र आहेत आणि यजुर्वेदातीलहि मंत्र आहेत. म्हणून ऋग्वेदातील ऋचा उच्च स्वराने म्हणाव्यात, आणि यजुर्वेदातील ऋचा नीच स्वराने म्हणाव्यात असा वेदवाक्याचा अर्थ वसतो

८. "ऋचा मोठ्याने म्हणाव्यात," "सामें मोठ्यानें म्हणावीत", आणि "यजुर्मंत्र हळू म्हणावेत", या वेदवाक्या-च्या अर्थाचा विचार चालला आहे. त्यात ज्या प्रकरणाच्या संबंधानें हें वाक्य आलें आहे त्या प्रकरणाचा विचार केला पाहिजे हे खरे आणि वाक्याचा अर्थ आम्ही जसा बसवितो तसा बसवू लागले असता प्रकरण सुटतें हेंहि खरे. परंतु वाक्याचा आणि प्रकरणाचा परस्पर विरोध आला असता वाक्य घ्यावें आणि प्रकरण टाकावे असा मीमांसकाचा सिद्धांत आहे. या सिद्धांताचा विचार पुढें चवदावे सूत्रीं पूर्णपणे होईल. मागलि दोन तीन सूत्रीं जो वादविवाद चालला आहे त्याचें रहस्य थोडक्यात वर्णिले पाहिजे ऋग्वेदातील मंत्र म्हणजे ऋचा ह्या तैत्तिरीय संहिता म्हणजे यजुर्वेद यामध्ये बऱ्याच आढळतात आणि प्राचीन आर्यांचा संप्रदाय ऋग्वेद मोठ्यानें म्हणायाचा आणि यजुर्वेद हळू म्हणायाचा, असा आहे तेव्हा यजुर्वेदामध्यें आणि ऋग्वेदामध्यें मंत्राच्या संबंधानें म्हटले तर भेसळ झाली आहे आणि म्हणण्याच्या संबंधानें भेद आहे तेव्हा दोहों-

veda whether they are really Yajur-mantras or Rig-mantras introduced into it, are to be chaunted low Hence the term veda is generic and the term mantras, specific. Again, if by the term Riks be meant the Rig-veda as well as the individual Rik-verses, the text quoted at the out-set makes no sense, for the Rik-verses may be found in the Rig-veda as well as in the Yajur-veda Hence the text signifies that the Rik-verses included in the Rig-veda are to be chaunted aloud, and the Rik-verses included in the Yajur-veda are to be chaunted low

8 The sense of the text the Riks are to be chaunted aloud the Sâmas or psalms are to be chaunted aloud and the mantras of the Yajur-veda are to be chaunted low—is under discussion. Hence the context of the text requires to be considered, and if the text be interpreted as it is interpreted by the opponent, the context is violated But the Mîmânsakas hold that when the context of a text comes in the way of syntactical construction of the text itself, the latter over-rules the former and the question of considering the context is set aside This exegetical principle will be fully examined in the foot-note on the fourteenth sûtra to come It is necessary to point out the bearing of the controversy carried on in the eight preceding sûtras The Riks or such verses as are given in the Rik-sanhitâ are met with in the Yajur-veda It was the custom of the ancient Âryas in India to chaunt the Rig-veda aloud, and the Yajur-veda low But the mantras of the former

मध्ये भेद पण त्यांचा असा विचार पडला यावर मीमांसकांनी असा सिद्धांत ठरविला, यजुर्वेद, ऋग्वेद आणि सामवेद हीं नांवें मंत्रांच्या संबंधानें पुढें आलीं नाहींत ऋग्वेदांतील सारे आम्ही त्या भागास ऋग्वेद म्हणतात. यजु र्वेदांतील मंत्र यजुर्वेद म्हणतात म ग त्यांत ऋचा असोत किंवा साम असोत ऋग्वेदाचा आणि यजुर्वेदाचा संबंध काय हा विषय विचार करण्यासारखा आहे त्यासंबंधीं थोडा असें म्हणतां येईल कीं ऋग्वेद हा एकच वेद आहे, तरी तसे नव्हे यजुर्वेद ऋग्वेदाहून भिन्न व प्रथम आणि मुख्य आहे निदान इतिहासदृष्ट्या यजुर्वेदाचें महत्त्व मोठें आहे या विषयाचा विचार स्वतंत्र पण व्हावा

are found mixed up with those of the latter Veda while there is a distinction as to the way of chanting them. Hence the question was asked—how is the *Rig* veda to be distinguished from the Yajur-veda? The Mimânsakas answer the question thus :—the names the *Rig* veda, and Yajur veda have connection with the individual mantras but a collection of the *Rik* verses is known as the *Rig* veda and all the mantras given in what is called the Yajur veda constitute the Yajur veda whether it includes the *Rik* verses or Sâma-verses. The question of the relation ship between the Yajur veda and the *Rig* veda deserves specially to be considered Suffice it to state the conclusion at which we have arrived Though some scholars broadly state that there is only one Veda properly so called and that is the *Rig* veda yet their statement is not to be accepted without any limitation. A part of the Yajur veda is independent of a part of the *Rig* veda and precedes the *Rig* veda in point of time At least the historical importance of the Yajur veda is great It is a subject by itself calling for independent enquiry

सूत्राणि.

## आधाने गानस्योपांशुताऽधिकरणम् ॥

**गुणमुख्यव्यतिक्रमे तदर्थत्वाद् मुख्येन वेदसंयोगः ॥ ९ ॥**

**पदार्थः** । गुणमुख्ययोः=गौणप्रधानयोः । व्यतिक्रमे=संस्पर्धायां । तदर्थत्वात्=( गौणस्य ) मुख्यार्थत्वात् । वेदसंयोगः=वेदसम्बन्धः ॥

**वाक्यार्थः** । गौणप्रधानयोः संस्पर्धाया प्राप्तायां मुख्येन वेदवचनस्य सम्बन्धः । कुतः । गौणस्य मुख्यार्थत्वात् ॥

**भावार्थः** । यद्गौणं तत् परार्थम् । यतस्तत् प्रधानस्यार्थं साधयति । गौणताप्रधानताविशिष्टं किंचिदपि वेदवाक्यं चेत् तस्यार्थे क्रियमाणे प्रधानस्य प्रबलता । कुतः । गौणं तु प्रधानमाश्रयति । अग्न्याधानकर्म याजुर्वैदिकम् । तस्योपांशुता । तदंतःपतितानि सामगानानि उपांशु कर्तव्यानि । यद्यपि सामगानानामुच्चैस्त्वम् तथाऽप्यऽग्न्याधानविषय आधान मुख्य सामगान च गौणम् । गौणस्योच्चैस्त्वं बाधित्वा याजुर्वैदिककर्मणोऽग्न्याधानस्य मुख्यस्योपांशुताऽवतिष्ठते ॥

अनुसधेयानि वेदवाक्यानि ॥

अग्निमाधत्ते । + य एव विद्वानग्निचरति । तै० ब्रा० ( १.१,५, १. ) ॥ ( य एव विद्वान् ) वारवतीयमभि गायते । तै० ब्रा० ( १.१,८,३. ) ॥ य एवं विद्वान् यज्ञायज्ञीयं गायति ॥ ( य एवंविद्वान् ) वामदेव्यमभिगायते । तै० ब्रा० ( १.१,८,२. ) ॥

अग्न्याधान करतांना सामगान हळू करावें हा विचार

९ गौण आणि मुख्य यांचा विरोध आला असतां मुख्याकरतां गौण आहे म्हणून मुख्याचा आणि वेदाचा संबंध आहे

THE SUBJECT OF THE HYMNS OF THE SÂMA VEDA BEING SUNG LOW AT THE TIME OF ESTABLISHING A SACRED FIRE.

9 The principal and subordinate statements being opposed (to one another), (the latter submits to the former) because the *subordinate statement* subserves the principal one Hence the principal statement (alone has) a connection with the Veda

गौण आणि मुख्य असे दोन विधि आहेत त्यांत गौण विधीचा एक धर्म आहे, आणि मुख्य विधीचा दुसरा धर्म आहे गौण विधीचे धर्म एकीकडे राहून मुख्य विधीचे धर्म सारे स्वीकारावे लागतात कारण गौण विधीस स्वातंत्र्य नाहि. मुख्य विधीचा जितका उपयोग साधेल तितका गौण विधीनें साधावयाचा म्हणून सहजच मुख्य विधीचे धर्म सर्वत्र प्रबळ होतात वेदवाक्याचें भाषांतर केलें म्हणजे हें निश्चय सहज लक्षात येइल "जो असें जाणतो (तो) अग्नि स्थापितो' अग्नि स्थापनाविषयीं हा मंत्र मुख्य आहे आणि याच संबंधानें सामें कशीं गावीत हें सांगणारे दुसरे मंत्र आले आहेत ते असे "जो असें जाणतो (तो) वारवंतीय नांवाचे साम गातो." "जो असें जाणतो (तो) यज्ञायज्ञीय नांवाचें साम गातो" "जो

9 The two kinds of statements—principal and subordinate—have already been explained Their exegetical functions differ When they conflict, the *principal* statement prevails because a subordinate statement has no independent function to perform It has to contribute to the power and use of the principal statement. Hence the principal statement invariably predominates. The translation of a Vedic text will illustrate and explain these remarks. "(He) who knows thus establishes fire." This is the principal text prescribing the establishment of the sacred fire In this connection, other mantras, prescribing the way in which Sâmas are to be chaunted, occur They are— (He) who knows thus, sings the Vârvantîya sâma. "(He) who knows this, sings the Yajnâyajnîya-sâma He who knows this, sings the Vâmadevya-sâma. It is already shown that the mantras of the Yajur veda are to be sung low

सूत्राणि.

## ज्योतिष्टोमस्य याजुर्वैदिकताऽधिकरणम्॥

### भूयस्त्वेनोभयश्रुति॥ १० ॥

**पदार्थः** । भूयस्त्वेन=बाहुल्येन । उभयोः (वेदयोः) श्रुतिर्यस्य कर्मणः तत् उभयश्रुति कर्म ॥

**भावार्थः** । सामवेदे यजुर्वेदेच किंचित् कर्म निरूप्यते । तत्र सामवैदिकं मुख्य वा गौणं । याजुर्वैदिक मुख्य वा गौणमिति विचारः । सिद्धांतस्तु यस्मिन् वेदे बहूनां गुणानां निरूपण तद् वेदोक्त कर्म मुख्यम् । यत्र भूयांसो गुणाः समाम्नाताः तत्र क्रियार्था चोदना । यत्र हि कर्तव्यतया चोदना तत्रेतिकर्तव्यता आकांक्ष्यते । यत्र चाकांक्षितेतिकर्तव्यता तत्रेतिकर्तव्यतावचनं न्याय्यम् । ये च भूयासो गुणाः सेतिकर्तव्यता ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

(ज्योतिष्टोमेन स्वर्गकामो यजेत) सुवर्गमेव तेन लोकं यंति । तै० सं० (७.४,१०,२.) ॥

असे जाणतो (तो) वामदेव्य नावाचें साम गातो" आता हें स्पष्टच आहे कीं, यजुर्वेदातील मंत्र हळू म्हणावयाचे आणि सामें मोठ्यानें गायाचीं अग्नीचे आधान यजुर्वेदातील मंत्राप्रमाणे करावयाचे आणि तें मुख्य आहे. मुख्य जें अग्न्याधान त्यास अनुसरून सामें गायाचीं. म्हणजे जरी सामें मोठयानें गायाचीं असा सिद्धांत आहे, तथापि अग्न्याधानाच्या संबंधानें यजुर्वेदात आलेलीं जी सामें तीं हळू म्हणायाचीं सूत्राचें तात्पर्य इतकेच कीं, मुख्याचे धर्मापुढें गौणाचे धर्म काहींच नाहींत

and that those of the Sâma, to be chaunted aloud But the establishment of the sacred fire is to be regulated by the dicta of the Yajur-veda, and these dicta are, therefore, principal The mantras of the Sâma-veda are to be sung as subserving the principal—the establishment of the sacred fire Though the general rule that the hymns of the Sâma-veda are to be chaunted aloud is recognised, yet the hymns or Sâmas prescribed in the Yajur-veda, and to be chaunted in connection with the establishment of the sacred fire (Agnyâdhâna) are to be sung low The gist of the sûtra is that the principal overrules its subordinate

ज्योतिष्टोमयज्ञ यजुर्वेदाप्रमाणें करावयाचा हा विचार

THE SUBJECT OF THE JYOTISTOMA BEING PERFORMED ACCORDING TO THE DICTA OF THE YAJUR VEDA

१० (एका कर्माचीं) दोन (ठिकाणीं) वर्णनें आहेत, पुष्कळ (गुणांच्या) अनुरोधानें (अमुक मुख्य वर्णन असा निश्चय होतो)

10 (When the same sacrifice is) described in two (different connections and places), the majority of marks (of one of the two descriptions determines the description to be principal)

१ हें सूत्र फार संक्षिप्त रीत्या रचलें आहे तथापि त्याचा अर्थ स्पष्ट आहे आणि मोठ्या वादविवादांत या सूत्राची योजना होते ती कशी? एकाच विषयाचे दोन निरनिराळ्या ग्रंथांत वर्णन आलें आहे मग त्यांतील मुख्य कोणतें आणि गौण कोणतें असा विचार पडला. ज्या ग्रंथामध्यें त्या विषयासंबंधी निरनिराळ्या तऱ्हेनें निरनिराळ्या धर्मांचें पुष्कळ निरूपण झालें असेल तो ग्रंथ मुख्य आणि त्या विषयासंबंधी सर्व निर्णय मुख्य ग्रंथांतील सरणी ज्या अनुरोधानें करावयाचा. येथवर ज्याचें मापावर केलें की सूत्रार्थ सहज लक्षात येईल 'सुखाची इच्छा करणारा ज्योतिष्टोमयज्ञ करतो" असें हें वाक्य यजुर्वेदांतहि आहे आणि सामवेदांतहि आहे यजुर्वेदाप्रमाणें ज्योतिष्टोमयज्ञ केला असतां सर्व कर्म हळू मंत्र म्हणून करावें लागेल सामवेदाप्रमाणें केला असतां सर्व कर्म मोठ्यानें मंत्र म्हणून करावें लागेल तर सामवेदांतील वि

10 Though the sûtra itself is much condensed yet its sense is plain enough It is used in important and practical controversies. How is this? For instance the same subject is discussed in two different works of two different authors or in two different places of the same work of one author The question is,—of two such descriptions, which is the principal and which—subordinate? The answer is—that description which mentions many marks goes into details, and throws sufficient light on the subject, is principal in preference to the description which mentions a few marks does not go into details and is general in its drift, though it treats of the same subject. Hence the principal description regulates what is to be done as prescribed by it and sets aside the other description which is to be considered subordinate. The translation of a Vedic text will illustrate and explain these statements. "He who desires Heaven sacrifices the Jyotistoma sacrifice." This text occurs in the Yajur veda as well as in the

म्हणून दांत नाहींत येणेंकरून देवतेच्या धर्माचें वर्णन होत नाहीं. अर्थवाद असें म्हटल्यानें मागील सूत्राची टीप स्पष्ट कळेल.

४६ दुसरें वचन तें कोणतें? "अर्ध्या पिठाचा हें" वचन पुढील वेदवाक्यांत आलें आहे. या वेदवाक्याचें भाषांतर पूर्वी आम्ही दिलें आहे तें भाषांतर शब्दशः पुन: आम्ही करतों म्हणजे वरील सूत्राचा अर्थ सहज लक्षांत येईल "सोम आणि पूषा या दोहोंस अर्पण करण्याच्या चरूचा निर्वाप करावा ज्याला पशूंची इच्छा आहे त्यानें अर्ध्या पिठाचा" हें वेदवाक्य घेऊन बौद्धाचार्य असें म्हणतो 'अर्ध्या पिठाचा' हें देवतेचें विशेषण आहे म्हणजे हें वाक्य देवतेचा धर्म दाखवितें. यावर वैदिकाचार्य असें म्हणतात कीं, तसा प्रकार नाहीं या वचनाचाहि क्रियेशीं संबंध आहे. अर्ध्या पिठाचा चरु आणि क्रिया यांचा परस्पर संबंध न मानला असता एका वाक्याचीं दोन वाक्यें होतील वाक्यार्थमीमांसादृष्ट्या वाक्यभेद हा दोष आहे हा दोष जितका टाळवेल तितका टाळावा. पुन: एकाच वचनाची दोन रीतींने व्यवस्था होत असतां जी व्यवस्था आपणास घेण्यास योग्य ती व्यवस्था घ्यावी, ही गोष्ट समजण्यास सुलभ आहे पुरत्या पूषा देवतेस पिठाचा हवि करावा आणि पूषा ही देवता देवतेच्या जोडप्यांत सापडली असता पिठाचा हवि करू नये—हा विषय घेऊन बौद्धाचार्यांचा आणि वैदिकाचार्यांचा वाद झाला वेदांनर्थे एक

an explanatory statement, because it explains the ground of an offering, (to be made to the sun) consisting of flour Hence the term *hetu*, signifying a ground or reason, is used in the sanskrita sûtra. Hence the sentence "it has no teeth" does not, in any way, qualify the god sun (Pûsâ), but offers an explanation of the principal action consisting in an offering of flour being made', these arguments explain the foot-note on the preceeding sûtra

46 What is this other Vedic text? "A half of flour" is a phrase used in the Vedic text which we have already translated But we offer again the literal translation that the reader may perceive the bearing of the phrase on which the argument of this sûtra turns "Let him consecrate boiled rice to be offered to the dual-god Soma-sun (Somâ-Pusâ), he who desires cattle, (to offer) one half made into flour" The Bouddhâchârya bases upon this text his statement that the phrase "one half made into flour" qualifies the dual-god Soma-sun The Vaidikâchârya, in reply, states that such is not the case, and that the phrase is connected with the verb of the principal sentence which it qualifies If the phrase one half made into flour—and the term—boiled-rice (Charu) be not connected with one another as a quality and the qualified, one sentence would be divided into two Exegetics considers the division of one sentence into two as an exegetical defect to be avoided as far as possible Again, it is easy to perceive that the interpreta-

मताचें निरूपण आलें आहे आणि आर्यांचा संप्रदाय दुसऱ्या तऱ्हेचा आहे म्हणजे वेदामध्यें आणि आर्य संप्रदायामध्यें विरोध आहे असें सिद्ध करण्यास बौद्धाचार्य प्रवृत्त झाले. असा विरोध दाखविणें ही बुद्धिवादाची पहिली पायरी आहे. आमचे सारे संप्रदाय वेदांस अनुकूल आहेत आणि वेद हे प्रमाणभूत आहेत या दोन गोष्टी पतकरल्या म्हणजे बुद्धिवादास मुळींच अवकाश राहत नाहीं. कोणत्याही ईश्वरप्रणीत ग्रंथावर न अवलंबतां बुद्धिवाद करणें हा बौद्धांचा बाणा. बुद्धिवादास वाट फुटावें म्हणून वेदामध्यें आणि आर्यसंप्रदायामध्यें विरोध आहे असें बौद्धाचार्य म्हणूं लागले. एकदां विरोध आहे असें पतकरलें की बुद्धिवादा वाचून व्यावहारिक किंवा धार्मिक संप्रदायाची व्यवस्था होणार नाहीं. मग बुद्धिवाद प्रबळ होतो. ही बुद्धिवादाची दुसरी पायरी. या वेळीं सार्वजनिक संप्रदाय वेदांतल्या मताच्या धोरणानें चालावेत. परंतु विचारी पंडित बुद्धिवाद्यांच्या धोरणानें चालवात. आणि जेव्हां केवळ बुद्धिवाद्यांच्या धोरणानें चालावयाचें, तेव्हां बुद्धिवाद एक प्रकारें सर्वत्र प्रबळ झाला. असो, बौद्धाचार्य हे सर्वत्र बुद्धिवाद करणारे होते. वेदामध्यें आणि आर्यसंप्रदायामध्यें विरोध आहे असें दाखविणें हें बुद्धिवाद आणि बौद्धधर्म यांचें पूर्वरूप. वैदिकाचार्य यांचें खंडण करण्यास प्रवृत्त झाले हें उघडच आहे.

tion which suits the reader best is to be accepted out of the two interpretations of which a Vedic text admits. Thus the Bouddhâchârya and the Vaidikâchârya argue—the one maintaining that, under all circumstances, an offering to be made to the god-sun, should consist of flour the other limiting the proposition of the Bouddhâchârya by stating that flour is not to be used when the sun is a member of a dual-god

What is the [illegible] of this controversy so vehemently carried on? The Bouddhâchârya attempted to prove that the Vedas conflicted with the customs of the ancient Âryas that is, the Âryas disregarded the injunctions of the Vedas. Why did the Bouddhâchârya attempt to do so? Because the first move of rationalism is to prove that there is opposition between the institutions of a nation and the principles it up-holds. There is no room for rationalism if it be once admitted that the institutions of a nation are in perfect conformity with the scriptures which it recognizes as revealed and authoritative. This is the first stage of a rationalistic movement. When it develops, it ceases to recognize any revealed scriptures. This is its second stage. The rejection of the authority of the Vedas was the characteristic doctrine of Buddhism after the advent of Goutama Buddha. In order to break ground, the early Bouddhâchâryas simply attempted to prove that the principles of the Vedas conflicted with the institutions supposed to be founded upon them. The existence of

## उपसंहार

या पादाच्या उपसंहारांत दोन प्रकारें विचार विशेष करावयाचा एक, शास्त्रदृष्ट्या वाक्यार्थमीमांसा, आणि दुसरें, उदाहरणाच्या प्रसंगानें प्राचीन आर्य संप्रदायाचा विचार प्रथम गृहीत पदार्थी घेतां जैमिनींनें दाखविली नंतर वाक्यार्थमीमांसादृष्ट्या पौरुषेयत्व आणि अपौरुषेयत्व ह्मणजे काय ? या मान्य शब्द ह्मणजे काय ? शब्दाचा आणि अर्थाचा संबंध काय ? शब्दाच्या अर्थाचें ज्ञान सामान्यतः होतें किंवा व्यक्तिद्वारा होतें ? शब्दाला विभक्ति लागली असतां अर्थ कसे करावयाचे ? निरनिराळीं पदें एकत्र मिळून वाक्य कसें होतें ? वाक्यांतील निरनिराळ्या पदांचा अन्वय क्रियेबरोबर कां करावयाचा? क्रिया मुख्य आणि बाकी सर्व कारकें गौण कां मानावयाचीं ? कर्त्याचा आणि कियेचा संबंध काय आहे ? आणि वाक्यांचे निरनिराळे प्रकार कोणते आहेत ? असा विचार झाल्यावर वाक्यार्थाचीं मुख्य प्रमाणें कोणचीं हा विचार या पादांत झाला आहे तीं प्रमाणें—श्रुति लिंग, वाक्य, प्रकरण, स्थान आणि समाख्या, हीं आहेत स्थान या प्रकरणाच्या संबंधानें क्रमप्रमाणाचा हि विचार झाला आहे परस्परांच्या संबंधानें या प्रमाणांच्या बलाबलाविषयीं विचार चवदावे सूत्रीं केला आहे आणि या विचाराची भूमिका तयार व्हावी ह्मणून ह्याच्या सूत्रीं जो सिद्धांत केला आहे

## SUMMARY

In this Summary the subjects treated of in the last chapter (Pâda) are to be examined from two different points of view—the one philosophical, bearing on exegetics, and the other historical, bearing on those practices and customs of the ancient Âryas which are introduced into this discussion by way of illustration. Jaimini at first discusses the authoritativeness of the scriptures recognized by the Âryas, next solves the problem whether the scriptures are *personal* or *impersonal* in the sense of being revealed by an inspired person or being themselves eternal, and answers the following questions:—What is Word? What is the relationship between a word and its sense? Is the sense of a word conveyed to the mind through the medium of a generic name or by means of the name of an individual? What are the senses of the different case-terminations of a noun? How is a sentence formed by putting together a number of words? Why are all the words in a sentence to be connected with its verb? Why is an action or the verb of a sentence to be considered its principal part and all its other parts dependent upon it? What is the relationship between the agent in a sentence and its action? And what are the different kinds of sentences? In the first two chapters of the first book of the Pûrva-mîmâṃsâ these problems are investigated and thus the ground for the discussion of the

त्याची योग्यता मोठी आहे. निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या आचार्यांनीं एकाच विषयाचें निरूपण केलें आहे, त्याचे लेख पुष्कळ आहेत. आपणास तर सारे आचार्य मानणें आहेत तसेंच वेदामध्येंहि एकाच विषयाचें निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळें वर्णन आहे. या निरनिराळ्या वर्णनापैकीं मुख्य वर्णन कोणतें असा विचार पडला. या विचाराविषयीं सिद्धांत दहाव्या सूत्रीं केला आहे आणि टिपेमध्यें या सूत्राचा व्यावहारिक उपयोग कसा आहे हें दाखविलें आहे हीं प्रमाणें घेऊन बौद्धाचार्यांनीं काढलेल्या दोषांचें वैदिकाचार्य जेव्हां निराकरण करूं लागले तेव्हां बौद्धाचार्यांमध्यें आणि वैदिकाचार्यांमध्यें वाद सहजच उत्पन्न झाला त्या वादाचें मुख्य स्वरूप इतकेंच कीं, वाक्यामध्यें कर्ता मुख्य मानला असता, आणि श्रुति, लिंग, वाक्य, इत्यादि मीमांसकांनीं वर्णिलेलीं प्रमाणें योजिलीं असतां, वेदाचा जो अर्थ बसतो तो आर्यांच्या सांप्रदायास सुटतो म्हणून वेदामध्यें आणि आर्यांच्या सांप्रदायामध्यें विरोध आहे. असें सिद्ध करण्यास बौद्धाचार्य झटूं लागले वाक्यामध्यें क्रिया मुख्य मानली असतां, आणि श्रुत्यादि वाक्यार्थ प्रमाणांची योजना केली असतां, बौद्धाचार्य जो विरोध दाखवितात तो दूर होतो. असें वैदिकाचार्यांचें म्हणणें पडलें

पुन , हा वाद चालला असतां आर्यांच्या सांप्रदायाचा विचार करावा लागला.

exegetical methods of proof is prepared In this chapter their number, their nature, and their bearing, are particularly examined What are these methods of exegetical proof? A direct statement, an indirect inferential statement, syntactical construction of a sentence, context, the sequence of thoughts or their collocation, and exegetical adjustments The subject of sequence of thoughts, whether grammatical or logical, is considered along with the subject of the collocation of thoughts The relative evidential power of these methods of proof is particularly explained in the fourteenth sûtra In order to pave the way for this explanation, a proposition is laid down in the tenth sûtra,—a proposition, the exegetical importance of which is great Different Âchâryas explain the same subject in different ways at different times Their writings are abundant We have to recognize them all as authoritative In like manner, throughout the Vedas the same question is sometimes answered in different ways in different places Of these different explanations of the same subject or of these different answers to the same question, which explanation or answer is principal and binding? This is the problem to be solved, and it is satisfactorily solved in the tenth sûtra We have pointed out the practical bearing of this solution in the foot-note on the same sûtra When the Vaidikâchâryas attempted to remove the objections of the Bouddhâchâryas against the Vedas, and to support their own interpreta-

अशा सांप्रदायांचीं उदाहरणें घेऊन त्यांनीं वादविवाद केला त्या सांप्रदायाचें स्वरूप-कथन करणें आणि उपपत्ति शास्त्रविषयें आम्हांस अवश्य आहे तो. त्यांहि सांप्रदायाविषयीं इतिहासदृष्ट्या विचार करूं लागलें असतां तीन गोष्टींकडे लक्ष द्यावें लागतें. आचाराचें किंवा सांप्रदायाचें स्वरूप, प्रसंग, आणि शास्त्र या तीन गोष्टी कोणत्याहि प्रकारच्या रिवाजा जनसमुदायाला चुकल्या नाहींत. जो जो प्रसंग पडतो तो तो प्रसंग टाळतां येत नाहीं. त्यामधून निभून गेलें पाहिजे. तो मनावर संस्कार करतात. मनावर जे संस्कार होतात त्यांपासून आचार उत्पन्न होतात. सर्व जनसमाजामध्यें असे आचार चालू असतात. परंतु ज्या प्रसंगामुळें हे आचार उत्पन्न झाले ते प्रसंग विसरून जातात. पुढें जे आचार जनसमुदायांत चालू असतात त्या आचाराविषयीं जनसमुदायांतील पंडित अनुमान करतात. त्या आचाराची उपपत्ति लावितात, आणि अमुक रीतीनें आचार पाळावेत म्हणून सिद्धांत बांधतात. अशा प्रकारचे अनुगम, उपपत्ति, आणि सिद्धांत, मिळून त्याच्या समाजास मान्य जें ठरतें त्यास त्या जनसमाजाचें शास्त्र असें म्हणतात, जेव्हां जनसमाजाची बुद्धि भ्रष्ट होते, आणि विचारशक्ति मंद होतात, आणि शास्त्रार्थ समजून घेण्याची त्यांच्या अंगीं सामर्थ्य नसतें तेव्हां त्यांचे आचार भ्रष्ट होतात, आणि त्यांच्या ठिकाणीं प्रचार माजतो असो. इतका एकंदर सामान्य विचार आम्हीं केला.

tions of Vedic passages by means of different exegetical methods of proof a controversy between the two schools of thinkers necessarily took place The secret of this controversy is that the customs and practices of the ancient Âryas conflict or seem to conflict when the doctrine that the agent of an action is principal and independent is recognized and when the exegetical methods of proof such as a direct statement an indirect statement and the rest, are applied to the interpretation of the Vedic passages The Bouddhâchârya endeavoured to point out particular cases and to demonstrate how the customs of the ancient Âryas conflicted with the injunctions of the Vedas. On the contrary the Vaidikâchârya endeavoured to show that there was no conflict between the customs of the Âryas and the injunctions of the Vedas when an action or the verb of a sentence is considered principal and independent, and when the six methods of exegetical proof are properly applied.

Again, in the course of this controversy some of the sacrificial customs and institutions of the ancient Âryas are referred to and the relationship between one another is adjusted. We think it necessary to describe these institutions and to explain their nature. When an institution is examined from an historical point of view three facts deserve special attention. The nature of the institution itself, the circumstances in which it originates, and the philosophical principles by which it is defend

प्राचीन आर्यांमध्ये मुख्य चालू आचार काय तो यज्ञ. आणि त्या सार्‍या यज्ञाचें स्वरूप दोन यज्ञांवरून स्पष्ट समजतें तथापि कोठलाहि यज्ञ म्हटला म्हणजे त्यामध्यें एक इष्टि असती किंवा अनेक इष्टया असतात आणि कोणतीहि इष्टि करणें झाल्यास तिचा मुख्य नमुना दर्शपूर्णमासेष्टि या दर्शपूर्णमासेष्टीचा इतिहासदृष्टया पूर्ण विचार आम्हीं मागें उपसंहारांत केला आहे पुष्कळ गायी बाळगून, त्यांना रानामध्यें चारून, थोडकेंसे शेत पिकवून, आर्य लोक जेव्हां आर्य देशांत रहात असत, तेव्हां प्रत्येकाच्या गृहामध्यें अग्नि स्थापन केलेला असे गृहपति, त्याच्या बायका, त्याची मुलें, आणि त्याच्या सुना, त्याचीं नातवंडें, त्यांच्या बायका आणि त्याची पणतवंडें, आणि त्याचे नातलग, अशीं एका संसृष्ट कुटुंबामध्यें शेपन्नास माणसें असत. तीं नित्य सकाळीं आणि संध्याकाळीं अग्नीची सेवा करीत आणि पंधरा दिवसांनीं एक वेळ पूर्णिमेच्या किंवा अमावास्येच्या दिवशीं यज्ञ करीत या यज्ञाच्या उपपत्तीचा प्रसंग आणि वर्णन करतांना प्राचीन आर्य गोपाल स्थितींत कसे होते आणि तत्संबंधीं त्यांच्या आचारांची उत्पत्ति, कशी झाली याचें निरूपण आम्ही पूर्वी केलें आहे. यज्ञ दोन प्रकारचे आहेत एक इष्टि आणि एक महायज्ञ किंवा संस्था. जरी संस्थेमध्ये पुष्कळ इष्टया येतात तरी संस्थेचा आकार स्वतंत्र आहे कारण इष्टींमध्ये नाहींत असे आचार संस्थेमध्यें पुष्कळ

ed when attacked The influence of the facts of real life is so universal that no nation or no individual can escape it The circumstances to which a nation must submit, and through which it has to pass, cannot but affect and mould its history Their force is so great that they produce a change in the mode of national thought, and in this change in the mode of national thought which produces certain aspirations, social institutions originate social institutions which are to be met with in every *nationality* on the surface of the earth, but the circumstances which are thus the cause of the origin of social institutions are forgotten in process of time Next the social institutions of a nation are systematically arranged, the relationship between one another is pointed out and explained, and the general rules, according to which the institutions are to be worked, are laid down by national philosophers The system propounded by philosophers, the explanations and those general rules which bear on social institutions, and which are recognized and traditionally handed down, constitute the religions code or the Shâstra of a nation But when the nation degenerates in intellectual power, when its feeling, being blunted, becomes lethargic, and when it thus ceases to possess the power of perceiving the *rationale* of its social institutions, its customs degenerate and cease to awaken the sentiments which they once did In this stage of the history of a nation customs are blindly followed We have thus

अध्यायांत जशी यांच्या इष्टीचा न
मुना दर्शपूर्णमासेष्टि आहे तसें यांच्या
सर्वांचा नमुना अग्निष्टोमयज्ञ आहे
अग्निष्टोमसंबंधी निरनिराळ्या आचार्यांचीं
उदाहरणें घेऊन वेदाचार्य आणि यज्ञ
चार्य वाद करतात. इतकेंच अग्नि
ष्टोमयज्ञ कोणत्या वस्तीं उत्पन्न झाला,
आणि त्यांतील निरनिराळ्या आचारां
ची उपपत्ति इतिहासदृष्ट्या कशी करता
येते हा विचार उपसंहारांत केला पाहिजे
हा वेळा या इराण दिशेस आमचे
पूर्वज कधिकाळ रहात असावेत असें
दिसतें आणि नर्मदा आणि दक्षिण
दिशेस त्यांचा प्रसार करणारे आणि
आपणास मध्यदेश्य (मेधियपत) म्हणणारे
असुरमनिष्ट यांस पुन्हा अहिछत्रील
पांचाल पूर्वज रहात असावेत
असें दिसतें कारण ऋग्वेदसंहितेंत
आणि यजुर्वेदसंहितेंत आणि अथर्वसंहि
तेंत नैऋत, निर्ऋति, आणि दक्षिणदिशा
यांची निंदा आहे आणि मध्यदेशा
च्या प्रशंसेत्वा (ऋचास्या) मध्यें असें
वर्णन आहे कीं, त्यांची नगरें समुद्रापर्यं
त दक्षिणदिशेस होतीं दुसरें असें कीं,
इराणांतील ईराण्य दिशेस जे आर्य रहात
होते त्यांचा आणि दक्षिण दिशेस जे
आर्य रहात होते त्यांचा मोठा झगडा झाला
म्हणजे वैदिक आर्य आणि मध्यदेश्य
आर्य यांच्यामध्यें कमतेपणी कलह झा
ला मध्यप । वैदिक आर्यांची निंदा
करून त्यांस देव असें शिवी देत आणि
वैदिक आर्य मध्यदेश्य आर्यांस असुर
असें उलट शिवी देत. या कलहाचे

passed a few general remarks upon the different stages of the development of national institutions. We will apply these remarks in the sequel.

The most engrossing institution of the ancient Ārya was a sacrifice which had developed into a considerable variety but only two sacrifices represented it and were called model-sacrifices. These were the new or the full moon sacrifice and the Agnistoma. The former is a simple sacrifice and the latter a complex one—the one being the model of the other. Any complex sacrifice like the Agnistoma or like the Vâjapeya based upon it consists originally of a number of simple sacrifices based upon the new or the full moon sacrifice which is then the main and ultimate model of all the Âryan sacrifices. We have already described the different parts of the new or the full moon sacrifice explained its nature and investigated its rational basis from an historical point of view in the summary of (II. 2.) We will however re-produce the main social features of a simple sacrifice. Every respectable Ârya in ancient times possessed a patch of ground which he cultivated. He had a number of cows whom he daily turned out to graze. He kept in his house a fire perpetually burning. His was a large patriarchal family consisting sometimes of a hundred individuals—he himself and his wife, his sons, and his daughters-in law his grandsons, and grand daughters-in law and his great grandsons, and

प्राचीन आर्यांमध्ये मुख्य चालू आचार काय तो यज्ञ आणि त्या साऱ्या यज्ञाचें स्वरूप दोन यज्ञावरून स्पष्ट समजेल तथापि कोठलाहि यज्ञ म्हटला म्हणजे त्यामध्यें एक इष्टि असती किंवा अनेक इष्टया असतात. आणि कोणतीहि इष्टि करणें झाल्यास तिचा मुख्य नमुना दर्शपूर्णमासेष्टि या दर्शपूर्णमासेष्टीचा इतिहासदृष्टया पूर्ण विचार आम्ही मागें उपसंहारांत केला आहे पुष्कळ गायी बाळगून, त्यांना रानामध्यें चारून, थोडकेंसे शेत पिकवून, आर्य लोक जेव्हां आर्य देशांत रहात असत, तेव्हां प्रत्येकाच्या गृहामध्यें अग्नि स्थापन केलेला असे गृहपति, त्याच्या बायका, त्याची मुलें, आणि त्याच्या सुना, त्याचीं नातवंडें, त्यांच्या बायका आणि त्याचीं पणतवंडें, आणि त्याचे नातलग, अशीं एका संसृष्ट कुटुंबामध्यें शेंपन्नास माणसें असत. तीं नित्य सकाळीं आणि संध्याकाळीं अग्नीची सेवा करीत आणि पंधरा दिवसांनीं एक वेळ पूर्णिमेच्या किंवा अमावास्येच्या दिवशीं यज्ञ करीत या यज्ञाच्या उपपत्तीचा प्रसंग आणि वर्णन करतांना प्राचीन आर्य गोपाल स्थितींत कसे होते आणि तत्संबंधी त्यांच्या आचाराची उत्पत्ति, कशी झाली याचें निरूपण आम्ही पूर्वी केलें आहे. यज्ञ दोन प्रकारचे आहेत एक इष्टि आणि एक महायज्ञ किंवा संस्था जरी संस्थेमध्यें पुष्कळ इष्टया येतात तरी संस्थेचा आकार स्वतंत्र आहे कारण इष्टींमध्ये नाहींत असे आचार संस्थेमध्यें पुष्कळ

ed when attacked The influence of the facts of real life is so universal that no nation or no individual can escape it. The circumstances to which a nation must submit, and through which it has to pass, cannot but affect and mould its history Their force is so great that they produce a change in the mode of national thought, and in this change in the mode of national thought which produces certain aspirations, social institutions originate social institutions which are to be met with in every nationality on the surface of the earth, but the circumstances which are thus the cause of the origin of social institutions are forgotten in process of time Next the social institutions of a nation are systematically arranged, the relationship between one another is pointed out and explained, and the general rules, according to which the institutions are to be worked, are laid down by national philosophers The system propounded by philosophers, the explanations and those general rules which bear on social institutions, and which are recognized and traditionally handed down, constitute the religious code or the Shâstra of a nation But when the nation degenerates in intellectual power, when its feeling, being blunted, becomes lethargic, and when it thus ceases to possess the power of perceiving the *rationale* of its social institutions, its customs degenerate and cease to awaken the sentiments which they once did In this stage of the history of a nation customs are blindly followed We have thus

असल्यास. असा यांचा हेतूचा म सुमार स्थापनमात्रेहि आहे. मात्र यांच्या सर्वांचा नमुना अग्निष्टोमयज्ञ आहे. अग्निष्टोमसंबंधी निरनिराळ्या आचारांचीं उदाहरणें घेऊन वेदार्थाचें आणि धर्मि याचें वाद करून. [illegible] अग्निष्टोमयज्ञ [illegible] प्रथम उत्पन्न झाला आणि त्यांतील निरनिराळ्या आचारांची उपपत्ति इतिहासदृष्ट्या कशी करतां येते, हा विचार उपसंहारांत करणार आहे [illegible] या. इराण्य दिशेस आमचे पूर्वज [illegible] रहात असावेत असें दिसतें. आणि [illegible] आणि दक्षिण दिशेत [illegible] [illegible] आणि [illegible] (मेसिडपटा) [illegible] [illegible] पास पुष्कळ अग्निहोत्र पाणी [illegible] पूर्वज रहात असावे असें दिसतें [illegible]. ऋग्वेदसंहितेंत आणि यजुर्वेदसंहितेंत आणि अथर्वसंहितेंत गोमत, निर्ऋति, आणि दक्षिणदिशा यांची निंदा आहे आणि [illegible] [illegible] संहितांच्या (ब्राह्मणांच्या) मध्यें असें वर्णन आहे कीं त्यांचीं नगर समुद्राच्या दक्षिणदिशेस होतीं. दुसरें असें कीं, [illegible] ईशान्य दिशेस जे आर्य रहात होते त्यांचा आणि दक्षिण दिशेत जे आर्य रहात होते त्यांचा मोठा संग झाला म्हणजे वैदिक आर्य आणि [illegible] आर्य यांच्यामध्यें धर्मसंबंधी कलह झाला [illegible]. वैदिक आर्यांची निंदा [illegible] त्यास देव असुर शिवी देत आणि वैदिक आर्य [illegible] आर्यांस असुर असी उलट शिवी देत. या कलहाचें

passed a few general remarks upon the different stages of the development of national institutions. We will apply these remarks in the sequel.

The most engrossing institution of the ancient Āryas was a sacrifice which had developed into a considerable variety; but only two sacrifices represented it and were called model-sacrifices. These were the new or the full moon sacrifice and the *Agnistoma*. The former is a simple sacrifice and the latter a complex one—the one being the model of the other. Any complex sacrifice like the Agnistoma or like the Vājapeya based upon it, consists originally of a number of simple sacrifices based upon the new or the full moon sacrifice which is then the main and ultimate model of all the Āryan sacrifices. We have already described the different parts of the new or the full moon sacrifice, explained its nature and investigated its rational basis from an historical point of view in the summary of (II. —) We will h[illegible] er re-produce the m[illegible] in social features of a simple sacrifice. Every respectable Ārya in ancient times possessed a patch of ground which he cultivated. He had a number of cows whom he daily turned out to graze. He kept in his house a fire perpetually burning. His was a large patriarchal family consisting sometimes of a hundred individuals—he himself and his wife his sons and his daughters-in law his grandsons, and grand daughters-in law and his great grandsons and

पर्यंत झऽन्द्हेस्तामध्ये आहे, आणि वैदिक आर्यांच्या ग्रथामध्यें हि आहे. वैदिक आर्य हिंदुस्थानामध्यें शिरून गगायमुनादि नद्याचे तीरीं अनार्यांस जिंकून नगरे बाधून राहिले असता, आणि इराण देशातील मज्जयग्ण आर्यांचा सर्वथैव सबध तुटला असता, असुरामध्ये आणि देवामध्ये जो कलह झाला त्याची त्यास आठवण होत असे. आणि त्या कलह सबधीं ते काहण्या सागत असत अशा काहण्या ऐतरेयब्राह्मणादि ग्रथामध्ये पुष्कळ आहेत. वैदिक आर्यास यज्ञ करण्याचा नाद जरा अधिक लागला आणि मज्जयग्ण आर्यास यज्ञाचा नाद कमी असे वैदिक आर्यामध्ये साहस फार असे रानामध्यें तुटून पडावें, शिकारी कराव्या, आणि पुढाऱ्याच्या निरनिराळ्या टोळ्या असाव्यात, अशी त्यांची स्थिति असे एकाच ठिकाणीं नगरे बाधून राहण्याकडे तादृश त्याचें लक्ष कमी असे शेतकी करण्यापेक्षा दूधदुपतें पुष्कळ करावें, गायी पुष्कळ बाळगाव्या, व त्या रानामध्यें चारित हिंडावें, सोमवल्ली मिळवावी, आणि तिचा रस काढून प्यावा, या गोष्टीची त्याना हौस फार. इकडे इराणाच्या दक्षिण दिशेस आणि नैर्ऋत दिशेस राहणारे मज्जयग्ण लोक शेतकी करण्यास फार झटत ते एक जागा धरून राहत जमीन मिळवून तिजवर ते मालकी करीत असत म्हणजे वतनवाडी करण्याकडे त्याचे लक्ष फार असे त्याना बागाबगीच्याचा नाद असे. आप-

collateral relations dependent upon him The most engrossing business in the family itself was the family-worship, which consisted in the invocation of Âryan gods and in the offerings of pure milk being thrown into the domestic sacred fire This was carefully done twice every day, once in the morning, and once in the evening Once a fortnight on the new and full moon days, a regular simple sacrifice was performed We have explained the circumstances in which such a simple sacrifice originated, and pointed out the relationship between its different parts, and the pastoral habits of the ancient Âryas The two kinds of sacrifices, simple and complex, are well-known in the ancient Vedic literature the one as an *isti* and the other as a Sansthâ Though a complex sacrifice or Sansthâ consists of a number of simple sacrifices or *istis*, the form of the first is independent, because there are many such practices connected with it as are not to be found in the simple sacrifices Hence as all simple sacrifices are based upon the new or the full moon sacrifice—*the* simple model sacrifice—so all complex sacrifices or Sansthâs are based upon the Agnistoma-sacrifice—*the* complex model-sacrifice The Bouddhâchârya and the Vaidikâchârya vehemently carry on a controversy about the sacrificial customs of the ancient Âryas—sacrificial customs connected with the Agnistoma sacrifice We, therefore, find it necessary in this summary to investigate the so-

या यज्ञामध्यें देवाला सोमरसाची पिण्याची योजना जितकी कशी झालेली तितकी सांगूं. आणि आपणामध्यें लोकांत ज निरनिराळे गट आहेत ते मोडून टाकून जितके मनुष्य । तितके एक, तितक्यांचा आचार एक, तितक्यांचा राजा एक — असा प्रकारची त्यांची सामाजिक व्यवस्था असे. वैदिक आर्यांच्या कांहीं तवेतीच्या त्रासामुळें कांहीं त्यांच्या सामाजिक व्यवस्थेमुळें, कांहीं मत्सर । आर्यांशीं कलह झाल्यामुळें कांहीं राजकीय, सामाजिक आणि धार्मिक मतभेदामुळें, वैदिक आर्यांचे गडाचे गट एका गोत्राचा दोन्हांच्या ठाव्या– हा देश सोडून हिंदुस्थानांत शिरल्यामुळें आणि ते कांहीं हजार दोन हजार लोक हिंदुस्थानांत आले असें नाहीं. आपले अनुयायी घेऊन विश्वामित्र एक वेळ आला. त्याच्या मागून वैश्याप वर्षांनीं कण्व आले त्यांच्या मागून कित्येक वर्षांनीं गौतम आले म्हणून वामदेवाचे अनुयायी शिरले पुढें मागें कांहीं आंगिरस आले. मध्यें कांहीं आत्रेय आंत शिरले. असे निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या मार्गानें आपआपल्या अनुयायांच्या टोळ्या घेऊन निरनिराळे वैदिक आर्यांचे पुढारी पंजाब देशामध्यें शिरून अनार्य लोकांस मोठ्या कष्टानें त्यांचीं नगरें व जमिनी हिसकावून घेऊन आपण सुखानें वास करूं लागले. अशी हा युद्धभूमि वैदिक आर्यांच्या पहिल्या ठेव्यास सोप इतक्यापासून सुमारें इराण देशांत पासमी

cial circumstances and conditions in which the Agnistoma sacrifice originated or rather which necessitated the institution of the Agnistoma sacrifice. We will attempt to explain the different parts of the Agnistoma sacrifice from such an historical stand point. There is sufficient evidence to state that the home of the ancient Vedic Âryas—their native land—was situated in the north east of Ariana and that their antagonists—the ancient Mazdâyasnians rational sacrificers the worshippers of Ahura mazda (Asura medhata) the ancestors of the modern Parsis—lived in the south west and in the south of Ariana because in the *Rig* veda, Yajur veda and the Atharva veda, Sanhitâs the south west (Nairrita and Nirriti) and the south are always condemned as inauspicious while it is stated in the Zenda vesta that the habitations of the Mazdâyasnians extended to the sea in the south and that the Âryas in the north east carried on perpetual war fare with those in the south and in the south-west. Such war fare between the Vedic and the Mazdâyasnian Âryas is frequently mentioned in the Zenda vesta and it has given a colour to the national songs and folk lore of the Vedic Âryas. The Mazdâyasnian Âryas stigmatized the ancient Vedic Âryas as Daevas or bright powers or aggressive warriors. The Vedic Âryas on the contrary stigmatized the Mazdâyasnian Âryas as Asuras or as clinging to existence—careful of personal life. After the Vedic Âryas had in

पसरण्यास प्राचीन काळीं पाचपन्नास वर्षें लागलीं असतील. आणि निदान हजार वर्षें आपला स्वदेश सोडून पंजाबाकडे येण्याचा आर्यांचा क्रम चालला असेल "स्वदेश सोडून जाऊं दे हे सारे वशिष्ठ, शतद्रूच्या काठीं भोगू दे त्याना सुख, काबूल, कंदाहार (कापिल आणि गंधारी) यांच्या जवळच्या दरींतून आणि घाटांतून भोगू दे त्याना कष्ट, आपल्याला एथें मिळते आहे अर्धी भाकरी तेव्हढी पुरे, आपण आपली जन्मभूमि कशास सोडावी"—असें जे म्हणत ते कांहीं वेळ मागें राहत खरें, परंतु त्यांची ही पुढें कांहीं वेळानें जन्मभूमि सोडण्याची पाळी येई. उदाहरणार्थ अंगिरस स्वस्थ राहिले असे दिसतें. पण ज्या मार्गानें पूर्वी वशिष्ट गेले त्याच मार्गानें जाण्याचें त्यांच्याहि मनामध्यें शिरलें आणि कांहीं वेळानें आपला स्वदेश सोडून पंजाबाकडे अंगिरस चालते झाले स्वदेश आणि परदेश या भेदाची आठवण पाणिनी पर्यंत आर्यजनास चांगली होती स्वदेशास ते अभिजन म्हणत, म्हणजे ज्या ठिकाणीं आपले पूर्वज राहत असत तो देश आणि ते ज्या वसाहती करीत त्यास ते निवास म्हणत पाणिनीचीं (४.३,८९–९०) सूत्रें पहा आता जसा अभिमान मुसलमान किंवा इंग्रज बाळगतात, तसा आम्हीं अस्सल विलायती असा कांहीं प्राचीन आर्य अभिमान बाळगीत.

स्वदेश सोडून परदेशामध्यें वसाहत करण्याकरिता जाण्याचा क्रम इराण दे-

vaded India, established themselves on the banks of the Jamnâ and the Ganges, conquered the non-Âryas, and lived in luxurious ease, and after they had ceased to have any connection with the Mazdâyasnian Âryas, they often burst into fits of indignation against them, recalled their past quarrels and complacently narrated the stories of the fights between the Devas and the Asuras Such stories abound in the Aitareya Brâhmana The Vedic Âryas gradually became exclusively sacrificial in their customs, while the Mazdâyasnian Âryas did not often perform sacrifices The Vedic Âryas still lived a pastoral life, the Mazdâyasnian Âryas had settled as agriculturists The Vedic Âryas were adventurous, and often penetrated the mountain-fastnesses of their native land, formed themselves into gangs under distinguished leaders, and often over-ran the adjoining tracts of land, they did not particularly seek to build villages, and to possess permanent agricultural enclosures They possessed cattle, specially cows, preferred dairy-business to agriculture and peaceful arts They wandered about in the mountains, procured the soma-plant, extracted its juice and quaffed it merrily in their social gatherings The Mazdâyasnian Âryas, on the contrary, residing in the south and the south-west, followed agricultural pursuits, and cultivated peaceful arts, they had fixed abodes, they boasted of their landed property, to the

असते तशी वेदी असते आणि उत्तरवेदीच्या पलिकडे यूप म्हणून एक मोठें दुरून दिसणारें निशाण लावलें असतें अस्तु विचार करण्या जोगी गोष्ट इतकीच आहे कीं, प्राचीन आर्य एकदेश सोडून दुसऱ्या देशात जाऊ लागले असता, किंवा देशातले देशात ग्रामांतर करू लागले असता, आपणांबरोबर आपला अग्नि नेत. जें नवें गृह करायाचें त्या मध्ये प्रथम अग्नीची सोय काढायाची, आणि वेदी तयार करायाची आणि त्या वेदीच्या पूर्व, पश्चिम, आणि दक्षिण बाजूस क्रमानें आहवनीयाचें, गार्हपत्याचें, आणि दक्षिणाग्नीचें, अशी कुंडे करायाचीं अशी अग्नीची व्यवस्था व सोय ज्या ठिकाणीं निघेल ते घर प्राचीन आर्यास पसंत पडे. या आमच्या म्हणण्यास प्रमाण मिळेल असें ऋग्वेदात वर्णन आहे (ऋ० वे० (१ १८९,१.) पहा. या मंत्राचें आम्हीं भाषांतर करून दाखवितों. "हे अग्नि, द्रव्य प्राप्त करून घेण्याकरिता चांगल्या मार्गानें आम्हाला ने. कारण) हे देव, तू सर्व खाणाखुणा जाणतोस (मार्ग संबंधी) दुःख आमचें नाश. मार्ग चुकण्याचें दुःख (मार्ग चुकविणारें पाप) दूर कर तुला आम्हीं पुष्कळ वेळ नमन करतों आणि स्तवितों" अशा प्रकारचे पुष्कळ मंत्र आहेत त्यावरून ही गोष्ट सिद्ध होते पुढील प्रायणीय इष्टींतील मंत्र पहा आम्हास वाटतें कीं, नव्या देशात अग्नीचें ज्यानें स्थापन केलें त्याला

with milk and honey" had been discovered beyond the Indus—to spread among the different Âryan tribes in ancient Ariana, and at least for a thousand years the Vedic Âryas must have continued to emigrate into the Panjab Though some stayed behind for a time and resisted the temptation of leaving their native land, saying—"let all these Vasisṭas go into a foreign country, let them live in what comfort they can in their new abodes on the banks of the Shtadru (Setlege), let them toil and drudge their way through the passes and the defiles of Kâmpeli and Gandhâri (Kabul and Kandhahar), we are content with what little bread we can afford, why should we leave our native land?" Yet these in time found it necessary to give in, and catching the contagion of emigration, departed The Angirasas, for instance, appear to have thus held out for some time, but they quietly followed the route taken by the Vasisṭas before them In process of time, however, the Angirasas themselves left their native country, and departed in quest of a new land Up to the times of Pâṇini the distinction between a native land (Abhijana) and a colony (Nivâsa) was remembered and maintained See the sûtras (4 3, 89-90) of Pâṇini As the modern English boast of being born and brought up in their own native country or of being pure Englishmen as distinguished from Anglo-Indians, so the ancient Âryas boasted of being born and brought up in their own native land or of being nobly

दीक्षित असें म्हणत. अग्निष्टोम कर ण्याचे पूर्वी ऋत्विजांस आमंत्रण करा वास पाहिजे. त्या ऋत्विजांची नांवें आम्हीं पुढें देतों. ब्रह्मा, होता, मैत्रावरुण, अध्वर्यु, प्रस्तोता, उद्गाता, प्रतिहर्ता, उपगातार (हे गातांना साथ क रणारे), प्रतिप्रस्थाता, नेष्टा, पोता, अच्छा वाक, अग्नीध्र, आत्रेय, सदस्य, [illegible] ग्रावस्तुत्, उन्नेता, शमिता आणि सुब्रह्म ण्य. गृहपति त्याची भार्या आणि इतकी मंडळी मिळून हा अग्निष्टोमाचा समा रंभ होत असे. असा अग्निष्टोमयज्ञ करावयाचा कसा परंतु याचा विचार केला पाहिजे. उपाय. स्वर्गाची इ च्छा आहे त्यानें ज्योतिष्टोमयज्ञ करा वा असें वेदवाक्य आहे. पण मीमां सकमतें स्वर्ग म्हणजे काय? स्वर्ग म्हणजे केवळ सुखविशेष. स्वर्ग शब्दाचा मूळ अर्थ मला मिळाला उत्तम देश असा असावा आणि स्वर्गशब्दाचें मूळ स्वरूप सुवर असें असावें. स्वर्गशब्दाचे सुवर हें रूप तैत्तिरीय संहितेमध्ये वारंवार आढळतें. ज्योतिष्टोमाच्या उद्देशानें पाहिलें असतां देशांतर ध्वनित होतें. यांच्या ऋत्विजांची व ज्योतिष्टोम करणाऱ्या मंडळींची सभा झाली, व प्रथम यजि लेल्या सभा (देवयजनदेश) सिद्ध झा ला, आणि यज्ञाची पात्रें आणि सामान सिद्ध करून ठेवलें, म्हणजे मग यजमान अप्सुदीक्षा करतो. ही अप्सुदीक्षा म्हणजे काय? गृहपति आणि त्याची पत्नी या पाण्यांत स्नान करून बाहेर

born (Abhijâta)

The Agnistoma sacrifice in our opinion is an historical symbol of the grand festivities in which the Âryas indulged when they could not but part with their friends and relations when they could not but shed tears at leaving behind them their homes and when their minds could not but be agitated by those feelings which every traveller experiences on the eve of his departure for an unknown distant land. The Agnistoma sacrifice originated in these circumstances—circumstances reference to which rationally explains all its constituent parts. We will describe the different parts of the Agnistoma sacrifice and offer an explanation. First the altar for the Agnistoma sacrifice is called the latter (uttara) Vedi. Special premises (deva yajana-desha) are laid out, a bower is erected, the different priests take their seats and keep their fires in the places assigned to them. In a part of the bower the stock of an Indian fig tree is fixed into the ground. Out of the bower stand two carts on which the twigs of Soma plants and other offerings are placed when they are taken from the Prâchîna vansha—the first vedi, the representative of the domestic ancestral hearth—to the latter (Uttara) vedi, the new or the future hearth. To the north of these carts is the place where the soma is kept. The seat and the hearth of the Adhvaryu is in the south-east of the bower. The seat and the hearth of the Agnidhra-priest is in the north-east and the Uttara vedi is situated

निघतात गृहपतीचें मुंडन होतें गृहपत्नीचीहि नखें इत्यादि काढतात म्हणजे तिचें एकदेशीय मुंडन करतात आणि त्याच्या अंगाला लोणी लावतात इतकी अप्सुदीक्षा. हें दुसरें कर्म या कर्मापासून असें ध्वनित होतें कीं, गृहपतीचा आपल्या जन्मभूमीशीं संबंध तुटला. आतां अग्निष्टोमयज्ञासंबंधीं तिसऱ्या कर्माचें वर्णन या कर्माचें नाव दीक्षणीयेष्टि ही इष्टि करतांना एक पुरोडाश सिद्ध करतात, आणि अग्नि आणि विष्णु या देवताच्या नावानें त्याच्या आहुति देतात. ही दीक्षणीयेष्टि करण्याचा हेतु काय ? जो जन्मभूमि सोडून परदेशीं जाण्यास निघाला त्याचा जणों पुनर्जन्मच होतो अशा प्रसंगीं मनुष्यजन्मसंबंधाचे सर्व प्रकार करावे लागतात, आणि गृहपतीला त्यास अनुसरून वागावें लागते उदाहरणार्थ, त्याला फडक्यांत गुंडाळतात, आणि जणों तो त्या वेळीं गर्भाशयामध्यें आहे असें मानतात. हा दीक्षणीयेष्टीचा आकार पुढें, स्वदेशभूमि सोडून जाण्यास सिद्ध झालेला जो आर्य त्याला आपल्या अंगावर काळ्या हरणाचें कातडें घ्यावें लागे, हातामध्यें काळ्या हरणाचें शिंग वागवावें लागे, कोरें वस्त्र पांघरावें लागे, आणि त्याच्या बायकोची कंबर दर्भाच्या केलेल्या दोरानें बांधावी लागे. इतकें हें कर्म केलें म्हणजे गृहपति दीक्षित झाला. मग त्यानें खोटें बोलू नये, फार बोलू नये, आणि तप आचरावें असा

beyond the place of the soma and of the carts on which the sacrificial provisions, symbolizing the traveller's provision, are kept In the west of the bower is the symbol of the ancestral vedi or the Prâchina-vansha which is erected in the style of the usual vedi necessary for the new or the full moon sacrifice And beyond the Uttara vedi stands the Yûpa, the symbol of the banner of advance, the top of which (Chasâla) is conspicuous from a distance Suffice it to remark that when the ancient Âryans travelled from one place to another in their country, or into foreign lands in quest of new settlements they carried their sacred fire along with them, and when they fixed their abode, they sought accomodation for their sacred fire as well as for themselves and built a sacred hearth, making, in the east, the west, and the south, the three altars characterized as follows—the one in which an offering is to be made (Âhavaniya), the altar of the house holder or the family-hearth (Gârhapatya), and the altar of the southern fire into which something is thrown to the demons (Dakshinâgni) The ancient Âryas preferred the house or the place in which all these conveniences of the sacred fire could be secured All these statements are more or less based upon Vedic texts See, for instance, (1 189, 1) of the *Rig-veda sanhitâ* The following is its translation "Oh Agni, take us by a good route for the acquisition of wealth (because) oh god, thou knowest all the marks (of the way) Remove our sufferings (on the way) Let there be

या मंत्राचा अर्थ. "निर्जल प्रांतां-तून आमचा प्रवास निर्भय असो सुखकर मुद्रामध्यें आणि जलपर्यटनाम-ध्यें आम्हास निर्भय असो. आमचीं लेंकरें जेथें वाढतात त्या निवासभूमि-मध्यें निर्भय असो धन मिळवितांना, हे मरुत देवतांहो, आम्हास निर्भय असो" "दूरदेशीं जातांना धन वि-पुल आहे अशी आम्हास स्वस्थता हे जी स्वस्थता आम्हास सुखी देशास नेते तीच स्वस्थता आमच्या आरण्यांतील गृहांत आमचे रक्षण करो ज्या स्व-स्थतेचें रक्षण देव करतात, आणि जि-च्या योगानें आम्हास निवासस्थान प्राप्त होतें, ती स्वस्थता आम्हास मिळो" हेच मंत्र अजून प्रायणीयेष्टि करतांना ऋत्विज म्हणतात हें ज्योतिष्टोमयज्ञ संबंधी पांचवें कर्म याच्या पुढे पायानें चालायाचें असतें. या कर्मास पदचर्या म्हणतात गायीला पुढें चालवितात, आणि तिच्या मागून गृहपति चालतो गायीनें सातवें पाऊल टाकलें, आणि ती पुढें गेली कीं, त्या ठिकाणीच स्फय नांवाच्या लाकडाच्या तरवारीनें रेघ मारतात, आणि या रेघेवर थोडें तूप ओततात या प्रसंगीं यजमानास जो मंत्र म्हणावा लागतो तो लक्षांत ठेवण्या-जोगा आहे त्याचा अर्थ "राक्ष-साच्या भोंवतीं रेघ मारली आमच्या शत्रूच्या भोंवतीं रेघ मारली हा मी त्या राक्षसाचा गळा कापतो तो आ-मचा शत्रु आहे आणि आम्ही त्याचे शत्रु आहोंत त्याचा गळा हा मी

ficial ground was prepared, after sacrificial utensils and other appliances were systematically arranged, the sacrificer performed what is called *Apsudîksâ* What is Apsudîksâ? The house-holder and his wife first bathe in water, then the house-holder is shaved, and the nails of his wife are pared This is supposed to be her partial shaving Then both are anointed with butter All these acts are collectively called Apsudîksâ This is the second stage of an Agni-*st*oma-sacrifice, a stage which suggests that the house holder has broken his connection with the old world or with his native land The third stage is the Dîk*s*an*î*ye*st*i A puro*d*asha or a sacrificial cake is to be prepared, and offerings are to be made in the name of Fire and Visnu What is the object of the Dîksa-nîye*st*i? He who leaves his native country, and departs in quest of a new land is, as it were, re-born, and of such a new birth a description is given in the Aitareya Brâhma*n*a In performing the Dîk*s*anîye*st*i, all processes of birth are enacted, and the house-holder has to go through them For instance, he is wrapped up in a cloth, and is thus supposed to be in the womb This is the form of the Dîk*s*an*î*ye*st*i To proceed, the Dîk*s*ita or an Ârya about to leave his native land, had to cover his body with the skin of a black antelope, to arm himself with the horn of a black antelope, to bear on his body a new cloth, and the loins of his wife had to be girded up with a rope of rush-like grass Such a house-

प्रयाणो" असें कोशाविष्ट होऊन हा मंत्र म्हटला गेला, हें प्रयाणी यांचाचें मग समाप्त होतें हें ज्योतिष्टोमयज्ञ संबंधी सहावें कर्म पुढें सोमक्रयणी निष्ठा व्यापाची

आर्य लोक असा प्रसंगीं सुताम सोम विकत कां घेत व त्या सोमाचें इतकें स्तवन कां करीत याचें थोडें वर्णन केलें पाहिजे ज्या प्रदेशामध्यें ते आर्य त्या देशामध्यें सोम सहज मिळत नसे तो सोम मागच्या प्रदेशानें गधारी लोक मिळवून आणीत त्याच्या मिळविण्याचा प्रकार असा त्यांमध्यें मूजवान् पर्वतावरचा सोम उत्तम सो मूजवान् पर्वतावरचा सोम जसा जसा कमी मिळू लागला तसा तसा मूजवान् पर्वतावरच्या सोमाची प्रतिष्ठा अधिक वाढत चालली मग आपला देश सोडून परदेशीं जाते वेळीं सोमरस पुष्कळ प्यावा आणि इष्टमित्रांसह वर्तमान मोठा भोजनसमारंभ करून मग सोमाचा निरोप घ्यावा अशी इच्छा स्वाभाविक आप गरीत या भोजनसमारंभाचें वर्णन केलें म्हणजे त्यापासून लक्षात येईल कीं आम्हीं जा अग्निष्टोमाच्या उत्पत्तिविषयीं कल्पना रचली आहे ती सयुक्तिक आहे किंवा नाहीं. सोम विकत घेतल्यानंतर आतिथ्येष्टि करीत म्हणजे सोमाचें आतिथ्य करीत सोम विकत घेतल्यानंतर त्याला पत्नीमान आकारावर घेऊन नंतर त्या सोमास पुढें मांडून तो जणों कोणी श्रीमंत पुरुष आहे असें समजून त्याला मधुपर्क अर्पण करीत (१—८)

holder now becomes a complete Dikrita. He is told not to speak untruth, not to talk much, and to observe austerities Thus dressed thus armed and thus advised an ancient Ârya was prepared for departure This is the third stage of a Jyotistoma sacrifice. The fourth stage simply consisted in procuring the means of performing the Agnistoma sacrifice—a religious feast which every Ârya on the eve of his departure had to give. What were these means! He had to procure some gold, some silver pieces of cloth, cows, a horse, a goat, and a ram This was called the acquisition of materials or means. The Prâyaniyesti or the Prâyaniya simple sacrifice is essentially symbolical of departure. In connection with it offerings of clarified butter and of boiled rice are thrown into the fire! What is the principal god of this simple sacrifice? The answer to this question establishes the explanation of the Jyotistoma sacrifice we give. The god is none other than *peace-on the-way* a *happy journey adieu* (Pathyâ svasti) Thus the *journey* is begun. Let it be marked that *Pathyâ svasti* is *peace-on-the-way quiet-on-the-way* that this is the god of the Prâyaniyesti and that, therefore this part of the Jyotistoma sacrifice pre-eminently symbolizes departure. The mantras chaunted in connection with this simple sacrifice support our explanation See the verses (X. 63 15 16) of the *Rig* veda sanhitâ. The translation of these mantras is —"keep us safe in our journey through waterless wilds. Keep us safe in our voy

**४४ तसें नव्हे, सर्वांची ( अवशिष्ट योजावीत ) कां तर विशेष कारणाचें निरूपण नाहीं कारण जो संस्कार करायाचा तेणेंकरून प्रधानाचें प्रयोजन साधतें ( सि० )**

**44 Not so, from all (the purodâsha cakes bits are to be cut up as offerings ) because of the absence of a special reason Because the preparatory operation performed upon a main offering serves its propose (Final statement.)**

४४ वैदिकाचार्य :– बौद्धाचार्य, तुमचें हें म्हणणें प्रशस्त नाहीं पुरोडाशावर संस्कार केले ते कशाकरितां? तर त्यांची प्रधान आहुति या संबंधानें त्यावर योग्य संस्कार व्हावा. स्विष्टकृत आहुतिमध्यें पुरोडाशांतील अवशिष्टाची योजना करून त्यांची प्रतिपत्ति करायाची हा एक संस्कारच आहे मग त्याचा पुरोडाशाच्या अवशिष्टाची अशी योजना केली नाहीं तर त्याच्या संबंधानें प्रतिपत्ति हा संस्कार चुकेल मग संस्कार जर चुकला तर संस्कार आपोआप कसे साधले? आणि प्रधान द्रव्यावर सारे संस्कार झाले असें आम्हास कसें म्हणतां येईल? म्हणून या एका कारणानेंहि, बौद्धाचार्य तुमचें म्हणणें आम्हास पटत नाहीं. शिवाय, एकाच पुरोडाशाचें अवशिष्ट घ्यावें आणि त्यानेंच स्विष्टकृत कर्म करावें असें वेदांत विशेष वचन तरी कोठें आढळतें आहे? असें विशेष वचन कोठें आढळलें नाहीं. या दुसऱ्या कारणानें तुमचें म्हणणें आम्हास, वैदिकाचार्य, पटत नाहीं आमचें म्हणणें असें आहे कीं, प्रधान देवतेकरितां केलेल

44 The Vaidikâchârya observes —" Bouddhâchârya, what you state is not reasonable. Why are preparatory operations performed upon Purodâsha-cakes? Because as main offerings, they require to be acted upon in a particular way The use of such Purodâsha-cakes in the simple sacrifice known as the Svista krit is only a subsidiary operation For this disposes finally of the residues of Purodâsha cakes as it constitutes what is known in the Pûrva Mîmâ'sâ as *pratipatti*, e g final disposal of an unused portion of a sacrificial material. Now then when the residue of a Purodâsha-cake is not used in the *svistakrit* simple-sacrifice ar important operation—to be performed upon it—is omitted that is, the main offerings consisting of the Purodâsha-cakes could not, under these circumstances, be acted upon in every way prescribed in the Veda. For this reason, Bouddhâchârya, I cannot admit your statement. Again, your statement is not supported by any direct Vedic text—your statement that the residue of any of the three purodâsh -cakes prepared for the main sacrifice may be used as an offering in the

सूत्राणि.

## लिंगदर्शनाच्च ॥ ४५ ॥ ( हे० ) ॥

**भावार्थः** । लिंग च दृश्यते । स्पष्टः सूत्रार्थः ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

देवा वै स्विष्टकृतमब्रुवन् हव्यं नो वह । सोऽब्रवीत् वरं वृणै भागो मेऽस्त्विति । वृणीष्वेति तेऽब्रुवन् । सोऽब्रवीदुत्तरार्धादेव मह्यं सकृत् सकृदवद्यात् ॥

## प्राथमिकशेषात् स्विष्टकृदाद्यनुष्ठानाधिकरणम् ॥

## एकस्माच्चेद्यथाकाम्यविशेषात् ॥ ४६ ॥ ( पू० ) ॥

**भावार्थः** । कस्मात् चिदेकस्मात् शेषात् प्रथमं हविर्ग्रहणीयं चेद् यथा यजमान इच्छति तथा स शेषो भवेत् । प्रथमो द्वितीयः तृतीय इति क्रमभंगः स्यात् नाम द्वितीये स्थाने तृतीयो भवेत् । तेन सर्वत्रानियमापत्तिः ॥

जे तीन पुरोडाश त्या पुरोडाशाच्या आहुति प्रधान देवते करिता देऊन तिहींतून तीन जीं निरनिराळीं अवशिष्टें राहिलीं त्याच्या योगानें स्विष्टकृत् साधावाचें.

subsidiary simple sacrifice known as svistakrit. I, therefore, cannot admit your statement My proposition is that in the case of the Svistakrit subsidiary simple sacrifice, the residues of the three Purodásha-cakes intended for the main gods of the main sacrifice, such as the new or the full moon sacrifice, are to be used "

४५ पुनः, वेदवाक्य हि असेंच अढळतें म्हणून (हे०)

45 Again because of an inferential statement (made in the Veda.) (Argument in support of the final statement.)

पहिल्या पुरोडाशाच्या अवशिष्टांतून स्विष्टकृत् कर्मास आरंभ करावा हा विचार

THE SUBJECT OF THE RESIDUE OF THE FIRST PURODÁSHA CAKE IN THE MAIN SACRIFICE BEING USED FOR THE FIRST OFFERING IN THE SVISTAKRIT-SACRIFICE.

४६ (कोणाच्या तरी) एका (पुरोडाशां) तून (स्विष्टकृताकरितां पहिली आहुति घ्यावी) असें म्हटलें तर (यजमानाची) जशी विशेष इच्छा असेल त्याप्रमाणें (त्यानें वागावें) (पू०)

46 If (it be admitted that the first offering to be made in connection with the svistakrit-sacrifice may be taken) from any one (of the three Purodásha-cakes,) then as the Yajamána specially wishes, so the order of the offerings may be established. (Opponent's statement.)

४५. वैदिकाचार्य म्हणतात—बौद्धाचार्य, आम्ही जसें म्हटलें तसें वेदवाक्यांत वर्णन केलें आहे. तें वेदवाक्य कोणतें म्हणाल तर हें पहा "देव रे स्विष्टकृत नांवाच्या अग्नीला बोलले बाबा, आमचा हव्यभाग ने. तो म्हणाला—माझा भाग असावा असा वर मागूं कां? ते म्हणाले वर माग. तो म्हणाला (पुरोडाशाच्या) मागील अर्धांतून मजकरितां एक वेळ एक वेळ अवदान घ्या' बौद्धाचार्य, या वेदवाक्यांत 'एक वेळ' 'एक वेळ' अशीं पदें आलीं आहेत. त्यांच्या सामर्थ्यानें

(पु—१)

45 The Vaidikáchárya observes:—"Bouddháchárya, I have some foundation for my statement in the Veda, see the text I quote. "Oh, gods said to the Svistakrit Agni—carry our offerings: He said—may I ask for a boon—let there be my share (of the sacrificial offering)? They said—ask a boon: He said—from the latter half itself he may cut up once, once, (an offering for me)' Bouddháchárya, you notice the word once repeated in this Vedic text. The significant power of this repetition shows that the residues of the three Purodásha-cakes are to be

सूत्राणि.

मुख्याद्वा पूर्वकालत्वात् ॥ ४७ ॥ (सि०) ॥

**भावार्थः ।** पूर्वकाले प्रधानहविःप्रदानसमये यः प्रथमो यो द्वितीयो यस्तृतीय इति यो गृहीतपूर्वः क्रमः तेनैव क्रमेण तेषां प्रथमादीनां ग्रहणं । गृहीतपूर्वक्रमस्य भंगे कारणं नास्ति । छंदतो न व्यतिक्रमः करणीयः ॥

## पुरोडाशविभागस्य भक्षतार्थाधिकरणम् ॥

भक्षाश्रवणाद् दानशब्दः परिक्रये ॥ ४८ ॥ (पू०) ॥

**भावार्थः ।** येन वेदवाक्येन ब्रह्मणे होत्र आग्नीध्राय च हविःशेषा दीयंते तस्मिन् वेदवाक्ये भक्षणार्थं ते दीयंतामिति नोक्तं । तस्मादेतेन दानेन ब्रह्मादीनामृत्विजां भृत्यत्वेन परिक्रयो भवति । कुतः । य एव श्रुतस्योत्सर्गे दोषः स एवाश्रुतपरिकल्पनायामिति शबरः । तस्मात् ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

इदं ब्रह्मणः । इद५ होतुः । इदमध्वर्योः । इदमग्नीधः । तै० ब्रा० (३.३,८,८.) ॥

वरून निरनिराळ्या पुरोडाशांतील जे राहिलेले अवशिष्ट भाग त्यांच्या योगानें स्विष्टकृत् कर्म साधावें.

४६ आर्यांच्या संप्रदायामध्यें आणि वेदामध्यें विरोध आहे असें दाखविण्याकरितां बौद्धाचार्य झटतात ते पुन असे म्हणू लागले वैदिकाचार्य, तुम्ही स्विष्टकृताच्या संबधानें इतके वेळ जे बोलला तें जरी पतकरलें तरी या स्विष्टकृत कर्मांच्या संबधानें अन्यवस्था आहे ती आहेच. तीन पुरोडाशांतून स्विष्टकृताकरिता अवदान घ्यायाचें. का होईना तीन पुरोडाश आहेत त्यांतून

used in the subsidiary simple sacrifice known as Svistakrit

46 The Bouddhâchârya seeks to establish that the injunctions of the Vedas conflict with the customs and practices of the Âryas He observes —"Vaidikâchârya, all your arguments advanced to prove the necessity of the svistakrit-simple-sacrifice, have not convinced me of there being no confusion about it You say that the offerings for the svistakrit-simple sacrifice are to be taken from the three Purodâsha-cakes prepared for the main sacrifice I grant this Again, the three Purodâsha-cakes may be

४७ तसें नव्हे, मुख्यांतून प्रथम अवदान घ्यावें कारण कालक्रमानें तो पूर्वी आहे (सि०)

भक्षाचें प्रयोजन साधावें म्हणून पुरोडाशाचा विभाग हा विचार

४८ भक्षाचें वेदांत स्पष्ट वर्णन नसल्यामुळें दान शब्दाचा अर्थ विकत घेणें (असा करावा) (पू०)

47 Not so, the first offering is to be taken from the principal Purodâsha, because of its being first in order of time. (Final statement.)

THE SUBJECT OF THE DIVISION OF THE PURODÂSHA-CAKE SERVING THE PURPOSE OF ITS BEING EATEN

48 Because eating a (Purodâsha) is not mentioned in the Veda, the term *dâna* (is used in the Veda) in the sense of a purchase (Opponent's statement.)

हा पहिला पुरोडाश, हा दुसरा पुरोडाश आणि हा तिसरा पुरोडाश असा त्यांची निरनिराळ्या रीतीनें व्यवस्था करतां येईल मग अमकाच पहिला, अमकाच दुसरा, अमकाच तिसरा असा क्रम राहणार नाहीं पण असा क्रम आर्य संप्रदायाप्रमाणें ठेवला जातो त्याला वेदाचा आधार आहे कोठें ? ह्मणून वेदामध्यें आणि आर्यसंप्रदायामध्यें विरोध आहे आमचें हें असें आहे कीं, जेव्हां का स्विष्टकृत कर्म करायाचें असेल ? अमुक पहिला, अमुक दुसरा अमुक तिसरा असा क्रमाकडे लक्ष देण्याची आवश्यकता नाहीं यजमानाच्या मनास वाटेल तो पहिला पुरोडाश त्यांतून प्रथम स्विष्टकृताकरितां अवदान घ्यावें आर्यांनीं हें सर्व मानावें ह्मणून पाहिजे बौधायनांच्या

allowed to be taken in a particular order such as, this Purodâsha cake is the first, and this another is the second and this, the third Purodâsha-cake But this order admits of being changed. Then some other Purodâsha would be first. Thus the three Purodâsha cakes would be arranged in different orders. A particular Purodâsha cannot be fixed upon as the first or the second or the third. But the Âryas consider it to be their established custom to recognize one order as fixed. Where is the foundation for this in the Veda? Hence the customs of the Âryas conflict with the Vedas. I state, therefore, that no matter when the Svistakrit subsidiary simple sacrifice is performed no particular order as to taking offerings from the Purodâsha-cake need be recognized, and that the sacrificer may take the first offering for

सूत्राणि.

**तत्रांस्तवाच्च ॥ ४९ ॥ (हे०) ॥**

**भावार्थः ।** अर्थवादत्वेन ब्रह्मादिभ्य ऋत्विग्भ्यो दत्तानां शेषाणां वेदे निरूपणादिति वचनेन स्वसिद्धांतं दृढयति पूर्वपक्षकारः ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

एषा वै दर्शपूर्णमासयोर्दक्षिणा ॥

**भक्षार्थो वा द्रव्ये समत्वात् ॥ ५० ॥ (सि०) ॥**

**भावार्थः ।** भक्षार्थं भागा ऋत्विग्भ्यो दीयते । तत्र यथा यजमानस्याऽस्वामित्वं तथर्त्विजां । कथं । निर्वापसमये यजमानः संकल्पं करोति । ततो देवताविशेषाय हविर्ददामीति यदुच्यते तेन स्वामित्वं देवतायाः न तु यजमानस्यर्त्विजां वा । एतदेव द्रव्ये समत्वं । भक्षार्थत्वेन हविर्द्रव्यस्य प्रतिपत्तिरिति शेषः । ऋत्विजो यद्भुंजते तत्रर्त्विजां हविर्भागानां चाभिसंबंधः । तेनार्त्विजो यथा हविर्भागानुपकुर्वंति तथा हविर्भागा ऋत्विज उपकुर्वंति ॥

कटाक्ष आहे यास पुढील सूत्रीं वैदिकाचार्य उत्तर देतात

४७. पुरोडाशातून प्रधान देवतेस आहुति देतात. त्या प्रधान देवता ज्या क्रमानें येतात तोच क्रम त्या पुरोडाशाचा असतो पुरोडाशाचा जो क्रम त्याच क्रमानें पुरोडाशाच्या आहुति स्विष्टकृत संबधानें घ्यायाच्या. असें सिद्ध असतां क्रमभग करावा. स्विष्टकृताच्या आहुति मनास वाटेल त्या क्रमानें द्याव्या असे म्हणणें कसें साजेल?

४८. बौद्धाचार्यांचें पुन. म्हणणे असे पडलें.--वैदिकाचार्य, दर्शपूर्णमास यज्ञ करताना इडाभक्षण करण्याचा आणि

the svi*sta*k*r*it sacrifice from any of these Purodâsha-cakes as he is pleased" Thus the Bouddhâchârya seeks to prove that the conduct of the Âryas ought not to be determined by their customs The Vaidikâchârya gives a reply in the next sûtra

47 Offerings cut up from Purodâsha-cakes are offered to the gods of the main sacrifice The order in which these gods come, is the order of the Purodâsha-cakes The offerings connected with the Svi*sta*k*r*it-sacrifice, therefore, follow the order of the Purodâsha-cakes Such being the case, it cannot be said that in the said Svi*sta*k*r*it-simple sacrifice there is no order of offer-

सूत्राणि.

०यादेशाद् दानस्तुतिः ॥ ५१ ॥

भावार्थः । दर्शपूर्णमासप्रकरणे हविर्भागानां यद् निरूपणं कृतं स दानस्तुत्यर्थं निर्देशः । तेन हविर्भागाः परिक्रयार्थेऽपरिक्रयार्थे चावकल्पेरन् । तस्मात् पूर्वपक्षकारस्य वचो निराकृतं ॥

तृतीयाध्यायस्य चतुर्थपादः समाप्तः ॥

तसाच दोष वेदामध्ये जें नाहीं त्याची कल्पना केली असतां घडतो. हें, वैदिकाचार्य, तुम्हास सांगण्यास नको.

४९. बौद्धाचार्य आपले म्हणणें दृढ करण्याकरिता पुन म्हणतात. वैदिकोचार्य, या दानाचे जें स्तवन केलें आहे तें पहा. तें वेदवाक्य कोणतें म्हणाल तर आम्ही दाखवितों. "दर्शपूर्णमास यज्ञाची ही वरें दक्षिणा." असे वर्णन आहे म्हणून ब्रह्मा, होता, अध्वर्यु, आणि आग्नीध्र याना पुरोडाशाचा अश द्यायाचा तो अश त्याचा रोजमुरा म्हणून द्यायाचा, दुसरें काहीं कारण नाहीं.

५०. वैदिकाचार्य उत्तर देतात, बौद्धाचार्य, तुमचें म्हणणें हें आहे पुरोडाशाचा जो अश ब्रह्मा, होता, अध्वर्यु आणि आग्नीध्र यास द्यायाचा तो त्यांस दान करायाचा. म्हणून तो त्याचा रोजमुरा आहे. पण असा प्रकार नाहीं. यजमान जेव्हा यज्ञास आरंभ करतो, तेव्हा हा देवता करिता पुरोडाश, असा पुरोडाशद्रव्याचा निर्वाप करून संकल्प करितो मग ते पुरोडाशसबधी द्रव्य यजमानाचें नव्हे. त्याच्यावर

and of the Prâshitra-dish Vaidikâchârya, you need not be told that one is as much to blame for imagining what is not in the Veda as for omitting what is in it."

49 The Bouddhâchârya again observes to strengthen the statement made in the preceding sûtra "Vaidikâchârya, see how the *dâna* I speak of is described and enlarged upon in the Veda. The Vedic text is "Well, this is the wages (daksinâ) for the new and full moon sacrifice" Hence parts of the residue of the Purodâsha-cake are to be given to the Brahmâ, Hotâ, Adhvaryu, and Âgnîdhra priests, and these are nothing more or less than their wages.

50. Vaidikâchârya gives a reply "Bouddhâchârya, this is what you say. Those parts of the remaining Purodâsha-cakes which are eaten by the Brahmâ, Hotâ, Adhvaryu and Âgnîdhra priests are their wages But this is not true, because when a house-holder begins a sacrifice, and before the Purodâsha is prepared, the rice of which it is made is consecrated to the gods of the sacrifice Then neither the rice nor the Purodâsha-cake

## ५१ विभाग केल्यामुळें दानाची स्तुति

## 51 Because of its being divided the present (to the priests) is particularly described

स्वामित्व देवांचें. मग त्या पुरोडाशाचें दान यजमानास कसें करितां येईल? पुरोडाश जर देतां आला नाहीं तर तो रोजमुऱ्या बद्दल कसा समजावयाचा? जितका ऋत्विजांचा त्या पुरोडाशावर हक्क तितकाच यजमानाचा हक्क. पुरोडाश दोघांचाहि नव्हे. पुरोडाश तिसऱ्याचाच ' द्रव्याविषयीं साम्य ॥" असें जें सूत्रांत पद आहे त्याचा हा इतका अर्थ. पुरोडाशाचा अंश ऋत्विजांनीं खाल्ला तर त्या अवशिष्ट राहिलेल्या अंशाची प्रतिपत्ति होते ह्मणजे पुरोडाशाच्या अवशिष्ट राहिलेल्या अंशाचा उपयोग घडतो आणि ऋत्विज तो खातात ह्मणून ऋत्विजांचाहि उपयोग घडतो. ह्मणून बौद्धाचार्यांचें ह्मणणें यथार्थ नाहीं

५१ दर्शपूर्णमास यज्ञामध्यें पुरोडाशाच्या अवशिष्ट भागा ऋत्विज आणि यजमान वांटून घेतात असें वर्णन आहे मग काय यजमान आपल्या स्वतास रोजमुरा घेतो? दुसऱ्यास रोजमुरा देतो असें तुम्ही ह्मणतां ह्मणून, बौद्धाचार्य, तुमचें ह्मणणें सर्वथा असमंजस.

made out of it belongs to the sacrificer It belongs to the gods alone. Then how can a sacrificer give it away to the priests and how can that which cannot be so given away be considered wages? The priests have as much a title to the Purodâsha-cake as the sacrificer It does not belong to them both. It belongs to others —gods." The terms *equality as to the substance* used in the sûtra are thus explained The residue of the Purodâsha-cakes when eaten by the priests is finally disposed of that is, it is somehow used in connection with the sacrifice for which it is prepared. This is its *pratipatti* and the purpose of the priests is also served in as much as they eat it. Hence the statement made by the Bouddhâchârya is not tenable.

51 The Vaidikâchârya again observes — Bouddhâchârya, the sacrificer and the priests divide a Purodâsha among themselves. Then does the sacrificer pay wages to himself as you say he pays wages to others? Bouddhâchârya, your statement therefore is unreasonable in every respect.

## उपसंहार.

प्रथम या उपसंहारामध्यें मोठा विचार हा करायाचा आहे कीं, बौद्धाचार्य आणि वैदिकाचार्य, यांचा खरोखर वाद झाला कीं काय? कोणी पंडीत असें म्हणतात कीं, बौद्धाचार्य आणि वैदिकाचार्य यांचा खरोखर वाद झाला नाहीं. असे कोणी पुरुष नव्हते मीमांसाग्रंथाची पद्धतिच अशी कीं, पूर्वपक्ष त्यामध्ये असावेत आणि सिद्धांत त्यामध्यें असावेत परंतु हें मत निराधार आहे असें आम्हास स्पष्ट म्हटले पाहिजे त्याचीं कारणेंहि दाखविलीं पाहिजेत. आपणच पूर्वपक्ष केले, आपणच शंका काढल्या, आणि आपणच समाधान केलें, तर त्या पूर्वपक्षाच्या अंगीं आणि शंकाच्या अंगीं सामर्थ्य कसें येईल? जितक्या वादविवादाचें आम्हीं निरूपण केलें आहे तितक्या वादविवादावरून वाचकाच्या लक्षात येईल की, बौद्धाचार्य ज्या कोट्या करितात त्याचे उत्तर देताना वैदिकाचार्याची लटपट होते. स्वतां च आपण कोट्या काढून स्वतास अशी अडचण कोणी करून घेईल काय? यावरून शंका काढणारा एक आणि समाधान करणारा दुसरा असें अनुमान केले पाहिजे. दुसरें — सूत्राच्या सरणीचा विचार केला असता हे अनुमान दृढ होते बौद्धाचार्य पूर्वपक्ष करतात आणि त्या पूर्वपक्षास दृढता यावी म्हणून निरनिराळ्या युक्त्या

## SUMMARY.

The first question to be answered in connection with this summary is, did a controversy between the Bouddhâchârya and the Vaidikâchârya really take place? Were they real blood and flesh men? European scholars are apt to say that there were no real controversialists of the type of the Bouddhachârya and the Vaidikâchârya, and that it is the essence of the Mîmânsâ-method to introduce into the discussion opponents, their pupils, their doubts or rather the representatives of two schools of thought, the one asserting a doctrine to be true and the other refuting it, the one doubting the validity of an argument, the other seeking to establish it But, we believe, such a statement appears to us to be unfounded We must state the grounds of our belief When the same author states the objections of an imaginary opponent, explains his doubts and tries to remove them, such fictitious objections and doubts cannot possibly possess that power which is inseparable from what is real From the arguments between the Vaidikâchârya and the Bouddhâchârya the arguments which we have already explained at length the reader will be able to perceive that the objections taken by the Bouddhâchârya against the Vaidikâchârya are often such as the latter cannot easily remove the subtle ingenuity of the Vaidikâchârya often fails to invalidate the arguments of the Bouddhâchârya, who as often succeeds in stating

मानितात आणि वैदिकाचार्य पूर्व पक्षकारांचें खंडन करितांना त्यांच्या पूर्वपक्षांस व पुराव्यांस उत्तरें देतात. अशी वादविवादाची परिपाठी पाह ली असतां 'आभासान्तमिदं सूत्रम्' असा एखाद्या सूत्रावर शेरा मारिला असतो त्याचा अर्थ काय? मागील पुढील सूत्राचा संबंध जुळावा म्हणून हें सूत्र आहे म्हणजे त्यांनी प्रथमी मांडणूमें शब्द घालून त्यांची मधील भाग ती केली, त्यांना 'आभासान्तम्' या मांडणीचें रूप करून घावें लागलें आणि हें सूत्र मूळ वादविवादांतील नव्हे असें दाखवावें लागलें या सरणीवरून असें अनुमान निघतें कीं, मूळ वाद विवादाचीं सूत्रें निराळीं आणि त्या वादविवादाची जुळणी व्हावी म्हणून मागून करून घातलेलीं सूत्रें निराळीं. या सूत्रसरणीवरून पूर्वपक्षकाराचा आणि सिद्धांतीचा वाद खरोखर झाला असें अनुमान निघतें तितकें —सुमारें पतंजलीच्या वेळीं व्याकरणाचें मोठें माप रूप होतें आणि मोठ्या कामांत भाष्य व्हावें म्हणून पतंजलीनें महाभाष्य रचिलें त्या महाभाष्यामध्यें देखील पक्षाविपक्षांचें जितकें प्रमाण होईल तितकें महाभाष्यकार करितात, आणि याशिवाय पंडितांची मानमान्यता वाढवितात, आणि त्यांच्या ह्या भाष्याचा वारंवार उल्लेख करितात असा मतसंगी कुविचार करणारे कांहीं आपपंडित होते त्यांनी वेदांतील पक्षसंबंधी एक एका वाक्याचा विचार केला आणि बोध दिले ते

his arguments powerfully and in establishing his conclusions successfully It is not possible therefore that the Vaidikâchârya advances such arguments against himself and shows himself worsted in the discussion with an imaginary opponent. On the contrary it is to be expected that his opponent of straw should be trampled under foot easily and that he himself should triumph over him. It is therefore proper to conclude that the Bouddhâchârya really discussed with the Vaidikâchârya. Secondly this conclusion can be strengthened by the method of the Pûrva Mîmânsâ-system The opponent first makes his statement, and then advances arguments in support of it. The Vaidikâchârya seeks to refute it and combats the arguments in order In the course of such a discussion a sûtra is introduced and is characterized as introductory to an argument to be stated Such a sûtra is merely put in by the compiler of the Pûrva Mîmânsâ system for connecting different parts of the discussion Such a sûtra is known to commentators as an introductory or a connecting sûtra They call it *âbhâsântam* The statement made by the âbhâsântam sûtra, either by way of an objection or an argument did not form an essential part of a discussion as it once really took place. This feature of the method of the Mîmânsâ discussion points to the conclusion that the statements made by the compiler of the Pûrva Mîmânsâ system can be separated from those made either by the real Vaidikâchârya or the Bouddhâchârya, and that a real

दोष तरी कसे कीं, याज्ञिकाचार्यांस या दोषाचें निराकरण करतांना पंचाईत पडे. परंतु इतकेंच नव्हे हे बुद्धिवाद करणारे केवळ दोषच देत नसत आपल्या सिद्धांताचें हि प्रतिपादन करीत अशा सिद्धांताचें आम्हीं प्रसंगवशात् निरूपण केलें आहे. ज्या पादाचा हा उपसंहार आहे त्या पादामध्यें असा वादविवाद झाला कीं, जे कोणतें एक कर्म करायाचें तेणेंकरून कर्मधर्म साधतो किंवा पुरुषधर्म साधतो. या वादाचें इंगित काय ! मनुष्य स्वतंत्र किंवा कर्माधीन या वादविवादावरून काय दिसून येतें ? गौतमबुद्धानें ज्या सिद्धांताचें प्रतिपादन केलें त्या सिद्धांताचें प्रतिपादन अजून होऊं लागलें नव्हतें. परंतु बुद्धिवाद करणारे पंडित असें म्हणूं लागले होते कीं, वेदामध्यें केवळ श्रौतकर्मांचेंच वर्णन नाहीं परंतु सामान्यमनुष्य मात्राचा सदाचार काय आहे हें वर्णिलें आहे आणि शुद्राचार आणि श्रौताचार यामध्यें भेद आहे. आणि असें वर्णन असल्यामुळें शूद्रादिकास देखील तो सदाचार पाळण्याविषयीं अवकाश सापडतो या कारणामुळें पूर्वपक्षकाराचा आणि सिद्धांत्याचा खरोखर वादविवाद झाला असे अनुमान निघतें. पण येथें –पुरुषधर्म श्रेष्ठ असें स्थापन करण्याकरितां बुद्धिवाद करणारे ओढाताण करीत, आणि इतकें देखील वैदिकाचार्यांस पतकरेना. पुरुषसामर्थ्य केवळ कोतें. कर्मसामर्थ्य मोठें विशाळ. असेंच या वादवि-

controversy did take place between them Thirdly, about the time when Patanjali flourished, the Âryas had elaborated their system of sacrifice, and Patanjali, the great grammatical exegetist distinctly states in his commentary that he writes it for the special purpose of elucidating and solving intricate sacrificial questions This great commentator often attempts to explain sacrificial practices and speaks respectfully of a class of writers or thinkers known as *yâjnikas* (those well-versed in sacrificial matters) whose maxims are often cited To these the rationalistic Âryas were opposed They took up every Vedic text bearing on a sacrifice, examined it, and founded upon it objections, such as the ritualistic scholars (Yâjnikâchârya) could not easily combat The rationalistic thinkers did not confine their opposition to the mere criticism of the Veda, but propounded doctrines of their own, some of which we have already explained in their proper place The controversy of which this chapter treats turns upon this question—an action being performed, does it benefit another action or does it benefit the agent? The question involves an important issue, as to whether man is a free agent or whether he is controlled by the accumulated effect of his own previous acts But this controversy shows that such a statement was not yet distinctly made, a statement from which the doctrines of Goutam Buddha sprang But the rationalistic thinkers had declared that the teachings of the Veda did not

वादाचें रूप होतें असून योगसिद्धांता चें बीजारोपण सुद्धां झालें नव्हतें असें म्हणण्यास चिंता नाहीं कारण योगसिद्धांतामध्यें असें प्रतिपादन आहे कीं, पुरुष स्वपराक्रमानें संचित कर्म मुळींच नाहींसें करतो हें तर काय पण नवें नवें सामर्थ्य त्यास संपादन करतां येतें पूर्वमीमांसेंत जे वाद आले आहेत त्यांमध्यें पुरुषाच्या अंगीं सामर्थ्य आहे आणि त्या सामर्थ्यापासून सदाचार उत्पन्न होतो आणि असा सदाचार वेदामध्यें निरूप । आहे इतकाच या वादविवादाचा अजून पर्यंत आरंभ होता हा बौद्धसिद्धांताच्या पूर्वरूपा चा मध्यमांकुर पाहून हि पूर्वपक्ष पक्षाचा आणि सिद्धांतीचा खरोखर वादविवाद झाला असें अनुमान निघतें पांचवें -मीमांसक आपल्या ग्रंथ परंप रेमध्यें शाबरभाष्य या भाष्याचा मीमां सकांस । शबर या मीमांसकाचें नांव महाभाष्यकारानें घेतलें आहे पाश्चा त्यांनीं केलेली मीमांसा पतंजलीच्या वेळीं प्रसिद्ध होती पाहून पतंजलीच्या वेळीं दीक्षाचार्यामध्यें आणि बुद्धिवाद करणाऱ्यामध्यें वादविवाद होत होता कारण ज्याअर्थी वादविवाद क रणारे पंडित पतंजलीच्या वेळीं खरोखर होते मग जरी ज्याअर्थी विषयीं वादविवाद करणारी मंडळी खरोखर होती तरीच वेदार्थाविषयीं वादविवाद करणारी मंडळी खरोखर होती असें हि ज्यास चिंता काय ? कारण कर्मीहि एक विषय संबंधीं बुद्धिवैराग्य कोणाहि वेदाम

bear merely upon the perform ance of rites and sacrifices but extended to the general conduct of man in common life Because good moral conduct is thus to be distinguished from ritualism and because the Veda inculcates the principles of moral conduct it applies to all classes and ad mits within its pale even the *Shûdras* These circumstances point to the conclusion that the BouddhAchârya and the Vaidi kâchârya were real blood and flesh men. Fourthly the ra tionalistic thinkers strained all their powers to prove that the principles of moral con duct of man (purusa-dharma) over ruled the ritualistic princi ples (karma-dharma.) But even such a statement so cautiously made could not suit the Vaidikâ-chârya the champions of the traditional Vedic polity The main feature of this controversy was that man s power of inde pendent action being limited the power of the accumulated effect of the actions already performed by him is exceedingly great. We think it may be stated that the main proposition of the Yoga system of philosophy was not yet laid down. Because it was not distinctly declared about this time that man can des troy the accumulated effect of his own actions and can ac-quire new powe that is, man is a free agent, who can think and conduct himself not only out of the consequences of his past acts but into a super-natural godliness The controversy shows that the rationalistic thinkers simply asserted that man pos-sesses at least, some power of independent action, that his

ध्ये होत नाहीं. यामुळे बौद्धाचार्यांचा आणि वैदिकाचार्यांचा खरोखर वादविवाद झाला असें अनुमान निघतें. सहावें —कुमारिलभट्ट आपल्या तत्रवार्त्तिक ग्रथामध्यें लौकायतिकांविषयीं आणि बौद्धपडितांविषयीं वारवार उसळतात आणि बौद्धपडितांचें म्हणणें असे आणि वैदिकाचार्यांचें म्हणणें असें असें स्पष्ट बोलून दाखवितात. यावरून मीमासक वैदिकाचार्यांचा आणि बुद्धिवाद करणाऱ्या बौद्धाचार्यांचा खरोखर वाद झाला असें अनुमान निघतें या अनुमानाच्या साखळीचा वाचकानीं विचार करावा. ज्या ज्या विषयाचा या पादात विचार झाला आहे त्या त्या विषयाचा या उपसहारामध्ये थोडासा उल्लेख केला पाहिजे. प्रथम —यज्ञोपवीत किंवा ब्रह्मसूत्र धारण करण्याचे तीन प्रकार आहेत निवीत, उपवीत आणि प्राचिनावीत. याला वेदाचा आधार काय असा पूर्वपक्ष बौद्धाचार्यानीं केला आणि त्या सबधानें तैत्तिरीय सहितेंतील (२ ५,११,१.) हें वाक्य काढलें आणि त्यावरून वाद सुरु केला. त्या वादामध्ये पुरुषधर्म कोणता आणि कर्मधर्म कोणता याचा विशेष विचार करावा लागला कारण श्रुति, लिंग, वाक्य, प्रकरण, स्थान हीं जीं मीमासकाचीं प्रमाणे त्याचीं वाक्यार्थ करताना यथार्थ योजना झाली पाहिजे असें बौद्धाचार्यांचे म्हणणे पडलें प्रकरणात आलेल्या विषयाचा प्रकरणाच्या सबधानें अर्थ लागू होत नाहीं म्हणून त्या प्रकरणातून

good conduct springs from such power, and that the principles of his good conduct are enunciated in the Veda This is the first form of the Buddhistic doctrine in its first stage These circumstances point to the conclusion that the Bouddhâchâryas and the Vaidikâchâryas of this controversy are real blood and flesh men Fifthly, the Vedic exegetes include among the number of the representatives of traditional Vedic polity, the name of Kâshakritsna The name of this exegete or Mîmânsaka is mentioned in the great commentary of Pantanjali, in whose time the work of Kâshakritsna was well-known a fact which indicates that the controversy between rationalistic thinkers and the champions of the traditional Vedic polity was real and not imaginary, because Patanjali's was pre-eminently the period of grammatical controversy Then it may be stated that as there were real controversialists who discussed grammatical questions, so there were controversialists who discussed the interpretation of the Vedic texts, because no nation, at any time, shows a one-sided intellectual development All these considerations point to the conclusion that the Bouddhâchâryas and the Vaidikâchâryas of this controversy were real blood and flesh men Sixthly, Kumârila bhatta indignantly makes frequent references to the Indian secularists (Loukâyatikas) and to Buddhists in his treatise known as the Tantravârtika, and points out the distinction between their doctrines This circumstance gives us grounds to conclude that

अर्थवाद आला आहे असें म्हणणें नीट जुळत नाहीं. सामान्य पुरुष-धर्माचें वर्णन वेदांत आलें आहे तें कशाचाच अर्थवाद नाहीं व त्याच्या संबंधाचें अपूर्वविधीचें वर्णनहि वेदामध्यें नाहीं तें केवळ अनुवाद आहे. तें केवळ अपदेश आहे हा कशाचा अनुवाद असें वैदिकाचार्यांनीं विचारलें असता बौद्धाचार्य म्हणत कीं, सदाचार म्हणजे काय हे मनुष्यास स्वभावतः ठाऊक आहे. तो काय हे मनुष्याचें मनच मनुष्यास सांगतें. असा पुरुषधर्माचा आणि कर्मधर्माचा संबंध बसवून अर्थवाद आणि अनुवाद याच्या अर्थाचा भेद नीट योजून बौद्धाचार्यांचे म्हणणें काय याचा विचार केला असता धम्मपदामध्यें प्रथम जे दोन श्लोक आले आहेत त्याचा कटाक्ष काय हें नीट कळून येतें व त्याचा अर्थहि यथार्थ कळतो.

मनो पुब्बगमा धम्मा ॥
मनो सेट्ठा मनोमया ॥ १ ॥
मनसा चे पदुट्ठेन ॥
भासति वा करोति वा ॥ २ ॥
ततो न दुःखम् अन्वेति ॥
चक्क व वहतो पद ॥ ३ ॥
मनो पुब्बगमा धम्मा ॥
मनोसेट्ठा मनोमया ॥ ४ ॥
मनसा चे पसन्नेन ॥
भासति वा करोति वा ॥ ५ ॥
ततो न सुखमन्वेति ॥
छाया व अनपायिनी ॥ ६ ॥

अस्तु. याचा विचार योग्य वेळीं

moral conduct of a man on all occasions of life, and that, therefore, there is no room for making a distinction between mere ritualism or Vedic acts (Vaidic Karma,) and duties of common life (loukika karma) It is the duty of man to mind moral rectitude These statements of the Bouddhâchârya often stagger the Vaidikâchârya He endeavours to adjust the interpretation of a Vedic text in the connection in which it occurs or in connection with some Vedic rite, and, when necessary, permits the transference of vedic texts—insisting upon this principle that the Vedas inculcate ritualism, not morality, and stating that the Vedic texts, occurring in different connections and in different places of the Veda, are to be considered as connected with one another as principal and subordinate statements In reply to this the Bouddhâchârya states that it is not proper to establish a relationship between two Vedic texts occuring in different parts of the Veda and in different connections, and to interpret them, as if the one were subordinate to the other, enlarging and explaining it The principles of morality being referred to in the Veda, they do not explain or originally state any ritualistic principle They merely re-produce what is already well-known what is moral rectitude being naturally well-known to man His mind or rather conscience distinguishing between right and wrong, inculcates upon him moral duties When this distinction between ritualistic duties and moral duties, and between the re-statement of a principle

आहे कीं, "जो ब्राह्मणाशीं रागें भरतो त्याची शंभरांनीं यातना करावी. जो त्याला मारतो त्याची हजारांनीं यातना करावी. जो त्याचें रक्त काढतो तो तितके वर्ष पर्यंत पितृलोकास जाणत नाहीं. (तितकीं वर्ष म्हणजे किती ?) जितके रक्ताचे थेंब पडून धुळीच्या कणाशीं मिळतील तितके वर्ष पर्यंत" हे वाक्य घेऊन बौद्धाचार्य विचारतात – दर्शपूर्णमासयज्ञ करतांना मात्र ब्राह्मणाशीं असें आचरण करूं नये, बाकीच्या वेळीं करावें काय ? तिसरे वेदवाक्य – "जिचें मळकें वस्त्र आहे त्या स्त्रिशीं बोलूं नये, तिचें अन्न खाऊं नये" अशीं जेव्हां हीं वेदवाक्यें निघालीं तेव्हां वैदिकाचार्यास वेदामध्यें पुरुषधर्माचें वर्णन आहे असें पतकरावें लागलें. आणि इतके वैदिकाचार्यांनीं पतकरलें म्हणजे किती पतकरलें हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल असा वाद होता होता बौद्धाचार्यांनीं आणखी एक कडी काढली आणि वादाचें स्वरूप बदललें. ते असें म्हणू लागले कीं, सामान्य पुरुषधर्माचें वर्णन वेदामध्यें आहे असें वैदिकाचार्य तुम्हास मान्य आहे. ठीक. लौकिक कर्म मनुष्यास कांहीं करावीं लागतात. लौकिक कर्म करतांना मनुष्य चुकला कीं, त्यानें वैदिक कर्म करून प्रायश्चित्त करावें. असा कांहीं वेदवाक्याचा अर्थ होतो जसें कोणी शूद्रापासून घोडा घेतला म्हणजे त्याला दोष लागला मग तो दोष जाण्या-

In the course of this controversy the Vedic text—one ought not to speak untruth is quoted and in connection with it the question is asked whether it inculcates ethics or ritualism If the text be merely ritualistic, it would mean that one ought not to speak untruth while he is performing a rite, that while at other times, one might speak untruth if he liked The Bouddhâchârya can not accept such an interpretation He observes that the Vedic text one ought not to speak untruth inculcates an ethical principle, in-as-much as it is a re-statement of a principle which purity of conduct involves In the course of such a controversy between the Bouddhâchârya and the Vaidikâchârya illustrative Vedic texts are quoted and interpreted, and they deserve the attention of the reader A text prescribes while performing a sacrifice one ought not to yawn violently another text is—"He, who scolds a Brahmin, should be inflicted with a hundred he, who beats him with a thousand he, who sheds his blood does not know the region of manes, for as many years as the drops of bloodshed take up the particles of dust" The Bouddhâchârya takes up this text and asks whether it applies to the time of performing the new or full moon sacrifice or to all occasions of common life The third text is—"one ought not to speak with a woman who has dirty clothes on, and ought not to eat food prepared by her" When these Vedic texts were laid before the Vaidikâchârya, he had to admit that they inculcated ethics more than ritualism, and the reader will be able

घेतला त्याने अश्वप्रतिग्रहेष्टि करावी पुन:, कोणी लौकिक व्यवहारामध्यें सोमरस पिऊन ओकला तर त्यानें सोमेन्द्रेष्टि करावी असा बौद्धाचार्य कांहीं वचनांचा अर्थ करूं लागले या वादविवादाची इतिहासदृष्ट्या आणि व्यवहारदृष्ट्या योग्यता मोठी आहे इतकें सुचवून आम्हीं सांगितलें पाहिजे पुढे

to see that in admitting this much how much the Vaidikâchârya admits. At this stage of this controversy the Bouddhâchârya advances an argument and thus gives a new turn to the discussion. He says—"Well Vaidikâchârya, you admit that the Veda is more ethical than ritualistic Good. When man has to perform some secular acts, and when he commits mistakes, he ought to perform a Vedic action by way of a penance. This is, at least the purport of some Vedic texts For instance some body receives a gift of a horse from a Shûdra and incurs a taint, to remove which he ought to perform a simple sacrifice known as the *ashva pratigraha iti* Again when some body over-drinks the soma juice in common life, and vomits it, he ought to perform a simple sacrifice known as *soumendra iti*" This is the way the Bouddhâchârya quotes and interpretes some Vedic texts. Suffice it to remark that this controversy is socially and historically important

# अथ तृतीयाध्याये पंचमः पादः ॥

## अथ ध्रुवाज्यादिभिः स्विष्टकृदादिशेषाऽननुष्ठानाधिकरणम् ॥

**आज्याच्च सर्वसंयोगात् ॥ १ ॥ ( पू० ) ॥**

**भावार्थः ।** अस्याऽध्यायस्य चतुर्थपादे द्विचत्वारिंशसूत्रे यः पूर्वपक्षः कृतः तत्संबंधेन च चतुश्चत्वारिंशसूत्रे यः सिद्धांतः कृतः तावुद्दिश्य पूर्वपक्षकारो ब्रवीति । सर्वेभ्यो हविर्भ्यो द्रव्यं गृहीत्वैडप्राशित्रसौविष्टकृतानि शेषकार्याणि कर्तव्यानीति यद् जैमिन्याचार्येणोक्त तदनुमापयाति । किमिति । उपांशुयाजसंबंधि यदाज्यद्रव्य तस्मात् स्विष्टकृदाद्यर्थं हविरवदातव्यं । कुतः । यथा चतुश्चत्वारिंशसूत्रे उक्तं तथा सर्वैर्हविर्द्रव्यैः सहोपांशुयाजाज्यद्रव्यसबंधात् । सूत्रस्थचकारपदेन द्विचत्वारिंशसूत्रसंबंधः सूचितः ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

स्विष्टकृते + + + उत्तरार्धादवद्याति । तै० सं० (२.६,६,५.) ॥ इडामुपह्वयते । तै० स० (२.६,७,३.) ॥ तद्यत्सर्वेभ्यो हविर्भ्यः समवद्यति ॥

**कारणाच्च ॥ २ ॥ ( हे० १ ) ॥**

**भावार्थः ।** यथा चतुश्चत्वारिंशसूत्रसंबंधेन वैदिकं लिंगं तथाऽत्रापि लिंगरूपं कारण प्राप्नोति ॥

अनुसधेयानि वेदवाक्यानि ॥

देवा वै स्विष्टकृतमब्रुवन् हव्यं नो वहेति । सोऽब्रवीद्वरं वृणै भागो मेऽस्त्विति । वृणीष्वेत्यब्रुवन् । सोऽब्रवीदुत्तरार्द्धादेव मह्यं सकृत् सकृदवद्यात् ॥

# तिसऱ्या अध्यायाचा पांचवा पाद.

ध्रुवाज्य इत्यादिकांच्या योगानें स्विष्टकृतासारखे शेष याग करायाचे नाहींत हा विचार

१ सर्व यज्ञाशीं संबंध असतो म्हणून (ध्रुवा) आज्य घेऊन (शेष कर्में करावींत) (पू०)

२. पुन कारण असल्यामुळें (हे०)

१ मागील पादामध्यें ४२व्या सूत्रीं पूर्वपक्षकारानें थोडी शंका घेतली आहे त्या प्रसंगीं भाष्याचार्यांचे समाधान करतांना वैदिकाचार्यांनी असें प्रतिपादन केलें आहे कीं, सर्व पुरोडाशांतून यांचे थोडे अंश घेऊन शेषकर्में करावीं दर्श पूर्णमासामध्यें तीन पुरोडाश करतात, हें सांगायला नको शेषकर्में तीं कोणतीं? इडाभक्षण, प्राशित्रभक्षण आणि स्विष्टकृत् हवि ध्रुवाज्य म्हणजे

# THE FIFTH CHAPTER OF THE THIRD BOOK

THE SUBJECT THAT SUCH REMAINING ACTS AS THE SVISHṬAKṚIT ARE NOT TO BE PERFORMED BY MEANS OF THE CLARIFIED BUTTER STORED UP IN A VESSEL CALLED THE DHRUVÂ AND KNOWN AS DHRUVÂJYA

1 By means of the Dhruvâjya the remaining rites are to be performed, because it is connected with the whole sacrifice (Opponent's statement)

2. (The Dhruvâjya is to be used in the remaining rites) because of a reason (Argument in suppprt of the opponent's statement.)

1 The Buddhistic opponent states his argument in the forty second sûtra of the preceding chapter In reply to him the Vaidikâchârya enunciates that the remaining rites are to be performed by means of the parts of all the Puroḍâsha-cakes. It need not be mentioned that three Puroḍâsha-cakes are prepared for the Darsha Pûrnamâsa sacrifice What are these remaining rites? They are Iḍâ-bhakshana or ceremoniously eating the food called Iḍâ the food offered and eaten by Brahmâ and known as Prâ

काय? यज्ञाकरता एकीकडे काढून घेतलेलें तूप. अलीकडले याज्ञिक लोक यज्ञांतिल तुपाची अशी व्यवस्था करतात कीं, प्रथम तूप बुधल्यामध्यें असतें त्यांतून थोडें तपेलींत काढून घेतात. तपेलींतून तूप यज्ञपात्रात काढून घेतात हें ध्रुवाज्य. याचा उपयोग यज्ञामध्येंच करायाचा. दुसरीकडे तें खर्चायाचें नाहीं मग यज्ञपात्रातून तूप काढून उपभृत नावाच्या पात्रात घ्यायाचें. त्याचा उपयोग इतकाच कीं, यज्ञामध्यें तूप योजण्या करता सहज घेता यावें उपभृत नावाच्या पात्रातून जुहू नावाच्या पात्रात ते तूप घेतात. ज्या पात्राने हवन करायाचें त्या पात्राचें नाव जुहू ध्रुवाज्याच्या उपयोगावरून आणि नावावरून असे अनुमान निघते कीं, प्राचीन काळीं आर्य लोक यज्ञाकरितां तूप साठवून ठेवीत असत. आणि ते निर्वाट ठेवीत म्हणून त्यास ध्रुवाज्य म्हणत. आणि यज्ञात कोठेहि तूप लागलें म्हणजे ह्या ध्रुवाज्यातून घ्यायाचें. असा साऱ्या दर्शपूर्णमासाचा आणि ध्रुवाज्याचा संबंध आहे ह्या संबधास उद्देशून, पूर्वपक्षकार म्हणतात'— "वैदिकाचार्य, मागील पादाच्या ४४ व्या सूत्रीं तुम्हीं काय सिद्धांत केला तो ठाऊक आहेना? तिन्ही पुरोडाशाचा साऱ्या यज्ञाशीं संबध आहे म्हणून शेष कर्माकरितां हवि त्या सर्वांतून घ्यायाचा ह्याचप्रमाणें ध्रुवाज्यातील राहिलेला शेष इडाभक्षणात किंवा प्राशित्रभक्षणात, किंवा स्विष्टकृत आहुतींत

shitra-bhakshana, and the oblations offered to Agni characterized as Svistakrit What is called Dhruvâjya? The clarified butter set apart for a sacrifice Those versed in sacrificial lore speak of clarified butter in this way —1. the clarified butter as kept in a leather-bag, 2 that which is taken in a common vessel 3 that which is taken in a sacrificial vessel This is Dhruvâjya It is consecrated, and can be used only for sacrificial purposes It cannot be used for any other purpose 4 It is next taken in a sacrificial vessel called Upabhrit This is done simply for the purpose of keeping it ready at hand for pouring it into that sacrificial vessel from which it is offered into the sacred fire This last vessel is called Juhû so named, because it is directly connected with oblations The use and the name of the Dhruvâjya gives us grounds to infer that the ancient Âryas stored up clarified butter specially for the purpose of a sacrifice, and it was called Dhruvâjya, because it was kept untouched It was had recourse to only when it was required for sacrificial purposes Thus the Dhruvâjya is connected with the whole Darsha Pûrnamâsa The Buddhist bases on this connection his statement — "Vaidikâchârya, you remember the argument you have already advanced in the forty-fourth sûtra of the preceding chapter, do you? Because, you say, the three Purodâsha-cakes are connected with the whole new or full moon sacrifice, the offerings for the remaining rites are to be taken from them all In like manner, I say that the Dhruvâjya—

योजावा असें आमचें म्हणणें आहे आणि या आमच्या म्हणण्यास वेदवाक्याचा आधार आहे तीं वेदवाक्यें हीं "दुसऱ्या अर्धातून स्विष्टकृत् आहुती करतां अवदान घेतो" "इडा भक्षाचें आव्हान करतो." "जें सर्व हविपासून त्याचें अवदान करतो तें."

२ बौद्धाचार्य आपल्या मताचें उपपादन करतो तें असें वैदिकाचार्य, मागील सूत्रांतल्या तुम्हीं जसें वेदवाक्याचें प्रमाण दाखविलें, आणि सिद्ध केलें कीं, सर्व पुरोडाशांमधून अवदानें घेऊन शेषकर्में करावीत, त्याप्रमाणेंच आम्हीं वेदवाक्याचें प्रमाण दाखवून अवशिष्ट राहिलेल्या ध्रुवाज्याची योजना शेषकर्मांमध्यें करावी असें सिद्ध करतों तीं वेदवाक्यें हीं "देव रे स्विष्टकृत् अग्नीला म्हणाले आमचा हवि ने तो म्हणाला माझा भाग असावा असा वर मागूं का? ते म्हणाले वर माग तो म्हणाला दुसऱ्या अर्धातूनच मजकरतां त्यानें एक एक वेळ अवदान घ्यावें"

which is connected with the whole new or full moon sacrifice—is to be used in performing such remaining rites as the Idâ bhakshana, Prâshitra bhakshana or Svista krit, and that this proposition is supported by Vedic texts, such as —"He takes an oblation (avadâna) from the second half" "He invokes the food (idâ bhakshana.) (From what is connected with) all offerings, he takes an oblation (avadâna)

2 In this sûtra, the Buddhist seeks to strengthen his statement He states:—Vaidikâchârya I can point out a Vedic text in support of my proposition that the Dhruvâjya is to be used in performing the remaining rites in the same way as you support your proposition that oblations are to be taken from all the Purodâsha-cakes for performing the remaining rites. The Vedic texts are — "The gods said to the Svista krit fire—take our oblation. He said—can I ask for this boon that I should have a sacrificial portion? They said—ask for a boon. He said—let them (priests) take for me the oblations (avadâna) once, once from the second half

सूत्राणि.

**एकस्मिन् समवत्तशब्दात् ॥ ३ ॥ ( हे० २ ) ॥**

**भावार्थः ।** अनुसंधास्यमानानां वाक्यानां व्यवस्थायां क्रियमाणायामाज्यद्रव्यात् स्विष्टकृदवदानं गृहीतं चेत् सर्वाणि वेदवाक्यानि साधु व्यवतिष्ठंते । अन्यथाऽनवस्थाप्रसंगः प्राप्नुयात् । कथं । एकस्मादवद्यतीति यद्वेदोक्तं तदन्यसंबंधं सूचयति तत्र मिश्रणमपेक्षितमितिच । तस्माद् गृहीतस्याज्यमिश्रणं । तस्मादवशिष्टाज्यात् स्विष्टकृतेऽवदानं ग्रहीतव्यं । सापेक्षसाकांक्षैकस्मिन्निति पदस्य चरुसबंधेन चारितार्थ्यं न भवेदन्यचरोरभावात् ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

अग्नये स्विष्टकृते समवद्याति । तै० ब्रा० (१,७,४,४.) ॥ आज्यादेकस्माच्च हविषोऽवद्याति ॥ मिश्रस्याऽन्येन हविषा समवद्याति ॥

**आज्ये च दर्शनात् स्विष्टकृदर्थवादस्य ॥ ४ ॥ ( हे० ३ ) ॥**

**भावार्थः ।** अन्यानि वेदवाक्यानि सति । तेषामाज्यद्रव्यात् स्विष्टकृदवदानग्रहणेन व्यवस्था । अन्यथाऽनवस्थाप्रसंगः । तस्मादाज्यात् स्विष्टकृदवदान प्राप्नोति । ध्रुवाज्यस्य यदभिधारण तेन स्विष्टकृतोऽर्थवादः । तेन स्विष्टकृदर्थमाज्यावदानमिति सूत्रार्थः ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

अवदाय अवदाय ध्रुवां प्रत्यभिघारयति ॥ स्विष्टकृतेऽवदाय न ध्रुवां प्रत्यभिधारयति ॥ न हि ततः परामाहुतिं यक्ष्यन् भवति ॥ ततः परामाहुतिं होष्यति ॥

